विदर्भ संशोधन मंडळ, ना...

स्वीय व पुरस्कृत मराठी, हिंदी व इंग्रजी ग्रंथ

संशोधन मुक्तावलि : स्तर १ ते ५—म. म. डॉ. वा. वि. मिराशी यांच्या संशोधनपर लेखांचे संग्रह किंमत अनुक्रमें रु. ४, ४, ४, ४ व ५

औपनिषदिक जीवनसौख्य—कै. डॉ. के. ल. दप्तरी यांनी लिहिलेला उपनिषदांचा उपसंहार. किंमत चार रुपये

संशोधनलेखसंग्रह : भाग पहिला—कै. हरि नारायण नेने यांनी लिहिलेल्या संशोधनपर लेखांचा संग्रह किंमत चार रुपये

मेघदूतातील रामगिरि अर्थात् रामटेक ( हिंदी व मराठी ) डॉ. वा. वि. मिराशी यांचा रामटेकविषयक ग्रंथ किंमत तीन रुपये

वार्षिके १९५८ ते १९६९ किंमत प्रत्येकी ५ रु.

Studies in Indology, Vol. I ( 2nd Ed. ) —Dr. V. V. Mirashi Rs. 30-00

Studies in Indology, Vol. II—Dr. V. V. Mirashi Rs. 20-00

Dr. Mirashi Felicitation Volume Rs. 40-00

विदर्भातील ऐतिहासिक लेखसंग्रह संपादक : डॉ. य. खु. देशपांडे व श्री. दे. गो. लांडगे किंमत चार रुपये

संशोधनांजलि श्री. दे. गो. लांडगे यांच्या संशोधनपर लेखांचा संग्रह किंमत पांच रुपये

पुरुजनचरित-नाटकम् ( कृष्णदत्तमैथिलकृत ) संपादक : प्रा. स. ल. कात्रे किंमत तीन रुपये

रा. सा. केशव शिवराम भवाळकर यांचे आत्मचरित्र—संपादक : प्रा. भ. श्री. पंडित किंमत दोन रुपये

मूर्तिप्रकाश ( तेराव्या शतकांतील महानुभावीय ग्रंथ ) —संपादक : डॉ. वि. भि. कोलते किं. दहा रुपये

निरुक्तशेष (पंधराव्या शतकांतील महानुभावीय ग्रंथ) —संपादक : डॉ. य. खु. देशपांडे किं. सहा रुपये

The Yādavas & their Times—Dr. O. P. Verma Rs. 45-00

प्राप्तिस्थान—चिटणीस, विदर्भ संशोधन मंडळ, पश्चिम हायकोर्ट मार्ग, नागपूर १

---

विदर्भ संशोधन मंडळ ग्रंथमाला, क्रमांक २४

# महाभारत युद्धाची कालगणनात्मक रहस्ये

प्रा. कवीश्वरांच्या या अत्यंत मूलगामी संशोधनाने महाभारताच्या अध्ययनात एका नवीन युगास प्रारंभ झाला आहे. त्यांनी आता सिद्ध केल्याप्रमाणे खरी गीताजयंती तिथी कार्तिक अमावास्या असून भीष्मनिधन तिथी माघ पौर्णिमा आहे. भारतीय पंचांगात व परंपरेत आता या तिथ्या रूढ करणे निःसंशय आवश्यक झाले आहे.

आचार्य प्र. के. अत्रे

संपादित 'मराठा' दैनिकातून

लेखक
ग. वा. कवीश्वर

किंमत [redacted] रुपये
पाच

विदर्भ संशोधन मंडळ ग्रंथमाला, क्रमांक २४

# महाभारत युद्धाची कालगणनात्मक रहस्ये

( गीताजयंतीची वास्तविक तिथि )

प्रा. ग. वा. कवीश्वर

इंदूर (मध्यप्रदेश)

१९७१

प्रकाशक

विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर

किंमत तीन रुपये

प्रकाशक :

**डॉ. मु. बा. देवपुजारी**

कार्यवाह, विदर्भ संशोधन, मंडळ,
नागपूर



या पुस्तकाच्या प्रती खालील ठिकाणी मिळतील—

(१) विदर्भ संशोधन मंडळ, पश्चिम हायकोर्ट मार्ग, नागपूर–१

(२) ग. वा. कवीश्वर, प्राचार्य, महात्मा गांधी महाविद्यालय, बडनगर, जि. उज्जैन. ( स्थायी पत्ता–३४ जानकीनगर, इंदूर–१, मध्यप्रदेश )

मुद्रक :

**पां. ना. बनहट्टी,**

नारायण मुद्रणालय,
धनतोली, नागपूर.

# प्राक्कथन

महाभारत युद्ध कोणत्या वर्षी आणि कोणत्या तिथीस सुरू झाले आणि ते किती दिवस चालले हे प्रश्न फार प्राचीन काळापासून अत्यंत वादग्रस्त झाले आहेत. 'महाभारत' ग्रंथात त्याविषयी अनेक उल्लेख आले आहेत. त्याची चिकित्सा 'महाभारता'चे प्राचीन टीकाकर नीलकंठ, तसेच आधुनिक भारतीय विद्वान श्री. स्वामिकन्नू पिल्ले, श्री. चिं. वि. वैद्य, श्री. ज. स. करंदीकर, डॉ. के. ल. दफ्तरी, डॉ. पां. वा. काणे वगैरे विद्वानांनी केली आहे. पण कोणालाही त्या सर्व उल्लेखांची तर राहोच पण बहुतांश उल्लेखांचीही सुसंगती दाखविता आली नव्हती. काहींनी तर हे काम अशक्य म्हणून सोडून दिले होते. सुमारे पन्नास वर्षांपूर्वी श्री. रामचंद्र लक्ष्मण गोखले यांनी महाराष्ट्र साहित्य पत्रिकेत (वर्ष ९, अंक २, पृ. ७५–७६) 'भारतीय युद्ध एक दिवसा आड होत होते' अशी कल्पना पुढे मांडून काही तिथ्यांचा समन्वय करण्याचा प्रयत्न केला होता. 'ही कल्पना फार बुद्धिमत्ताद्योतक आहे आणि तिने युद्धारंभवाचक सर्व वचनांची उत्तम संगती बसते' असे त्यानंतरच्या पत्रिकेतील (वर्ष ९, अंक ३, पृ. ११८–१२०) आपल्या लेखात डॉ. दफ्तरींनी म्हटले होते. पण त्या कल्पनेनुसार भीष्मांचे शरशय्यापतन आणि युद्धसमाप्ती यांच्या तिथ्या ठरविताना श्री. गोखल्यांनी चुका केल्या होत्या. शिवाय महाभारतयुद्धाच्या वेळी मंगळ, बुध व शुक्र यांच्या उदयांचे जे उल्लेख आढळतात यांच्याशी ती कल्पना जुळत नव्हती. म्हणून महाभारतयुद्ध कार्तिक अमावास्येस सुरू झाले आणि ते (मध्ये अवकाशदिन न सोडता) एकसारखे चालू होते असे आपले मत डॉ. दफ्तरींनी आपल्या पूर्वोक्त लेखात मांडले होते.

प्राचार्य ग. वा. कवीश्वर यांनी 'महाभारत' ग्रंथातील युद्धविषयक वचनांचा सूक्ष्म अभ्यास करून ती सर्व सुसंगत आहेत हे गेल्या तीन चार वर्षांत दिल्ली, इंदूर, उज्जयिनी, अमरावती, गोवा, पुणे, मुंबई वगैरे

ठिकाणी दिलेल्या आपल्या व्याख्यानांत साधार दाखविले होते. महाभारत युद्ध एक दिवसा आड होत होते याच मुख्य कल्पनेवर त्यांचे विवेचन आधारले आहे. त्यांनी त्यायोगे युद्धाच्या सर्व तिथ्या, बलरामाच्या तीर्थयात्रेचे दिवस, भीष्मांचे निधन इत्यादिकांचे 'महाभारता'तील उल्लेख कसे बरोबर जमतात हे सविस्तर दाखविले आहे. स्वपक्षप्रतिपादनाबरोबर परपक्षखंडनही साधार केले आहे. आता या कल्पनेला न जुळणारा असा क्वचितच एखादा तिथीचा उल्लेख महाभारतात अवशिष्ट असेल. तसा असल्यास तो प्रक्षिप्त मानण्यास हरकत नाही.

दोन वर्षांपूर्वी नागपूर येथे विदर्भ साहित्य संघात प्रा. कवीश्वर यांची या विषयावर व्याख्याने झाली. त्या वेळी 'महाभारतयुद्ध एक दिवसा आड होत होते' या शीर्षकाचा श्री. रा. ल. गोखले यांचा महाराष्ट्र साहित्य पत्रिकेतील पूर्वोक्त लेख आणि डॉ. के. ल. दफ्तरी यांनी केलेले त्याचे परीक्षण ही आम्ही त्यांच्या नजरेस आणून दिली. तोपर्यंत त्यांना त्यांची माहिती नव्हती. तेव्हा त्यांचे एतद्विषयक संशोधन स्वतंत्र आहे यात संशय नाही. एकच कल्पना अनेकांस स्वतंत्रपणे कशी सुचते ह्याचे हे उदाहरण आहे. शिवाय ती कल्पना श्री. गोखले यांस पूर्वी स्फुरली असली तरी तिच्या योगे महाभारतातील युद्धविषयक व इतर उल्लेख कसे बरोबर जमतात हे प्रथम सविस्तर दाखविण्याचे श्रेय सर्वस्वी प्रा. कवीश्वरांचे आहे.

युद्धविषयक तिथिनक्षत्रांचे उल्लेख जमले तरी महाभारतातील पूर्वोक्त ग्रहांचे उल्लेखही वरील कल्पनेशी सुसंगत आहेत हे दाखविणे अवश्य आहे. प्रा. कवीश्वरांनी तेही करण्याचे अभिवचन दिले आहे.

प्रस्तुत ग्रंथातील विवेचन मान्य झाल्यास—आणि ते सर्वमान्य व्हावे इतक्या प्रमाणांनी साधार प्रतिपादिले आहे—सध्या प्रचलित असलेल्या काही संस्मरणीय तिथ्या ( उदाहरणार्थ गीताजयंतीतिथी, भीष्मनिधनतिथी ) बदलाव्या लागतील. विवेकी जनतेची त्याला संमती मिळेल अशी आशा आहे.



प्रा. कवीश्वरांचा प्रस्तुत प्रबंध आमच्या मंडळाच्या 'वार्षिक १९७०' मध्ये प्रथम प्रसिद्ध झाला. त्याचे महत्त्व जाणून मंडळाने प्रा. कवीश्वरांच्या संमतीने तो स्वतंत्र पुस्तक रूपाने प्रसिद्ध करण्याचे ठरविले. या प्रबंधाने मंडळाच्या संशोधन ग्रंथमालेत मोलाची भर घातल्याबद्दल आम्ही प्रा. कवीश्वरांचे ऋणी आहो.

विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर
१ मार्च १९७१

**वा. वि. मिराशी**
कार्याध्यक्ष

# प्रस्तावना

विश्वप्रसिद्ध महाभारत काव्यांतील अनेक प्राचीन कालगणनात्मक कूटस्थळांचा आता श्रीसरस्वतीच्या कृपेने पूर्ण उलगडा झाला असून, त्यावर सर्व प्रमाणांसह माझा विस्तृत ग्रंथ ( तूर्त हिंदीत ) लिहून तयार आहे. त्याच्या पूर्वार्धात वनवासकालीन गूढ तिथ्या व तत्संबंधी अनेक चमत्कारिक रहस्ये उघड झाली आहेत. उत्तरार्धात युद्धकालीन तिथ्या स्पष्ट झाल्या असून युद्धारंभाची अर्थात् गीताजयंतीची खरी तिथि (कार्त्तिक) अमावास्याच सिद्ध झाली आहे. पैकी, उत्तरार्धाचा काहीसा सारांश या मराठी पुस्तिकेत दिला आहे. पूर्वार्धाचाही शीघ्र प्रकाशित केला जाईल.

या संक्षिप्त पुस्तिकेत निष्कर्षाची संपूर्ण प्रमाणे आली नाहीत. मात्र मूळ ग्रंथ प्रकाशित झाल्यावर वाचकांच्या उरलेल्या शंकाही दूर होऊ शकतील. मध्यंतरी ज्या विद्वानांनी या संशोधनावर ( पुस्तिकेच्या शेवटी दिलेले ) उत्कृष्ट अभिप्राय व्यक्त करून मला प्रोत्साहित केले त्यांचा मी ऋणी आहे. या संबंधात आधुनिक भारतवर्षाचे एक महान नेते स्व. डॉ. सम्पूर्णानंद आणि महाराष्ट्राचे सुप्रसिद्ध स्व. आचार्य अत्रे यांचे मला विशेष स्मरण होते. तसेच आतापावेतो अनेक स्थळी ज्यांनी ज्यांनी या विषयावर माझ्या व्याख्यानमाला आयोजित केल्या, आणि ज्या अनेक मराठी व अन्य वृत्तपत्र–नियतकालिकांनी या संशोधनासंबंधी वेळोवेळी वृत्तांत व विशेष लेखही प्रकाशित केले त्या सर्वांचा मी आभारी आहे.



अग्रगण्य इतिहाससंशोधक म. म. डॉ. वा. वि. मिराशी यांनी सत्यान्वेषण वृत्तीने या संशोधनात विशेष रुचि घेतली, व विवेचनाच्या सूक्ष्म अवलोकनानंतर ही पुस्तिका विदर्भ संशोधन मंडळातर्फे प्रकाशित करवून तिला आपल्या अधिकारी वाणीने प्राक्कथनही लिहिले, याबद्दल मी अंतःकरणपूर्वक कृतज्ञता व्यक्त करितो. मंडळाचाही मी आभारी आहे.

इंदूर
१९–१२–७१ (रामदासनवमी)

**ग. वा. कवीश्वर**

## शुद्धिपत्र

| पृ. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | खालून दुसरी | समजुतीवर आधारलेले आहे. त्याची | समजुतींवर आधारलेले आहे, ज्यांची |
| ५ | १३ | देणे | येणे |
| ६ | शेवटची | 12 | p. 12 |
| ७ | शेवटची | पंचेवीस स्थाने दूर | एक्केचाळीसाव्या स्थानावर |
| ८ | पहिली | प्रमाणे बलराम | प्रमाणे (यात्रारंभ युद्धाचे २२–२३ दिवस पूर्वी थेट द्वारकेपासून मानून बलराम ) |
| ८ | श्लोक | शौचे | शौचं |
| ११ | २ | दहाव्या | दहाव्या ऐवजी पहिल्या |
| ११ | ८ | ' अष्टपंच ' | ' अष्टपंच 'चा |
| २६ | ११–१२ | पंधरा स्थाने पुढे | पंधराव्या स्थानावर |
| ३५ | १२ | पूणे | पुरा |
| ३६ | ७ | या वेळी कृष्णपक्षच | या वेळी शुक्लपक्षच |
| ४२ | शेवटची | हामकवि | महाकवि |
| ४६ | १९ | आणि | आदि |

---

# महाभारत युद्धाची कालगणनात्मक रहस्ये

## १

## प्रास्ताविक

महाभारत विश्वसाहित्यात एक अद्वितीय ग्रंथ आहे. त्याच्या रचनेच्या संबंधात एक मनोरंजक दंतकथा प्रचलित आहे. महर्षि व्यास त्याचे कर्ते मानले जातात. जेव्हा त्यांनी या महाकाव्याचे पूरे कथानक आपल्या मनात तयार करून घेतले, तेव्हा काव्यरूपात ते प्रत्यक्ष लिहून घेण्यासाठी त्यांनी स्वतः गणपतीला विनंती केली. गणपतीने अशी अट घातली की, त्याची लेखणी (अर्थात् व्यासांची काव्यरचना) अविरत चालत राहिली पाहिजे. याच्या उत्तरात महाकवीनेही आपली अट घातली की गणेशानेही प्रत्येक श्लोकाचा वास्तविक सुसंगत आशय ध्यानात घेऊनच तो लिहिला पाहिजे. या विलक्षण 'अटीतटी'च्या संदर्भात महर्षि व्यासांनी आपल्या काव्यरचनेत ठिकठिकाणी असे गहन श्लोक करणे प्रारंभ केले की, त्यांचा गूढार्थ समजण्यासाठी विद्येची देवता गणेश यालाही कांही वेळ विचार करावा लागे, आणि तेवढ्या अवकाशात महाकवि पुढील कित्येक श्लोक रचून तयार ठेवीत ! अशा प्रकारे श्लोकरचना व लेखन दोन्हीही अविरत चालू राहिली !

या दंतकथेत काही सार असो वा नसो, हे तर सर्वप्रसिद्धच आहे की महाभारत काव्यात त्याच्या महान रचयित्याने आव्हानपूर्वक अनेक दुर्गम गूढ श्लोक ठेवले असून, त्यांचा खरा आशय शोधून काढण्याचे प्रयत्न विद्वान कित्येक शतकांपासून करीत आहेत. या कूट श्लोकांची संख्या व त्यांच्याविषयी महर्षि व्यासांचे आत्मविश्वासपूर्ण आव्हान आदिपर्वात पुढील श्लोकांत व्यक्त झाले आहे.[1]

ग्रंथग्रंथिं तदा चक्रे मुनिर्गूढं कुतूहलात् ।
यस्मिन् प्रतिज्ञया प्राह मुनिर्द्वैपायनस्त्विदम् ।। (आदिपर्व) १।८०।।

अष्टौ श्लोकसहस्राणि अष्टौ श्लोकशतानि च ।
अहं वेद्मि शुको वेत्ति संजयो वेत्ति वा न वा ।।८१।।

तच्छ्लोककूटमद्यापि ग्रथितं सुदृढं मुने ।
भेत्तुं न शक्यतेऽर्थस्य गूढत्वात् प्रश्रितस्य च ।।८२।।

---

१. या लेखात उद्धृत व आधारित महाभारताचे श्लोक गीता प्रेस (गोरखपूर) च्या आवृत्तीतून घेतले आहेत. मात्र मी पुण्याच्या भांडारकर संशोधन संस्थेद्वारा प्रकाशित महाभारताच्या आवृत्तीशी ही त्यांची तुलना करून पाहिली आहे. त्या आवृत्तीत भांडारकर संस्थेने प्रमाणित मानलेल्या पाठाशिवाय अन्यही कित्येक वैकल्पिक पाठभेद दिलेले आहेत. अध्याय व श्लोक क्रमांकात अर्थातच असलेल्या फरकांशिवाय, मूळ श्लोकांत जो किरकोळ शाब्दिक भेद आढळला, त्याने माझ्या मुख्य प्रतिपादनाला बाधा पोचत नाही. जेथे एक दोन स्थळीं महत्त्वाचा भेद दिसला तेथे त्याचा मी विशेष उल्लेख केला असून, मी स्वीकारलेला पाठ निश्चितच कसा अधिक विश्वासार्ह आहे याचीही चर्चा केली आहे. पण याचा असा अर्थ नव्हे की, गीता प्रेसने श्लोकांचे जे (हिंदी) भाषांतर दिले आहे ते सर्वच बरोबर आहे. कित्येक महत्त्वपूर्ण स्थळी ते भाषांतर त्याच परंपरागत समजुतीवर आधारलेले आहे. त्याची भ्रामकता मी या लेखात विस्तृत रीत्या स्पष्ट केली आहे.



ही कूटस्थळे अनेक प्रकारची आहेत. त्यांतील काही दर्शनशास्त्र-विषयक असून ती प्राय: श्रीमद्भगवद्गीतेत आढळतात. काही कूटे प्रसंग-वर्णनात आली आहेत; उदाहरणार्थ, महाभारतयुद्धात अर्जुनाने सूर्यास्ता-पूर्वी जयद्रथवध केल्याचा जो अत्यंत रोमांचकारी प्रसंग आहे, त्याच्या वर्णनात महाकवीने श्रीकृष्णद्वारा निर्मिलेल्या मायावी दृश्याच्या संबंधात एक गहन कूट ठेवले आहे. काही इतर कूटे स्थळनिर्देशाशीही संबंधित आहेत; ती वनपर्वात आढळतात. आणि शेवटी राहिली सुप्रसिद्ध काल-गणनात्मक कूटे. त्यांचा संबंध महाभारतकथानकातील प्रमुख घटनांच्या निश्चित तिथ्यांशी व कालानुक्रमाशी आहे.

या कूटस्थळांमुळे महाभारत काव्यात अनेक जागी अनाकलनीय विसंगतीचे आभास निर्माण झाले असून, त्यांना पाहता अनेक विद्वान असा विचार व्यक्त करीत असतात की हे महाकाव्य एकाहून अधिक कर्त्यांची रचना असली पाहिजे. परंतु मला असा नम्र आत्मविश्वास वाटतो की, या कालगणनात्मक कूटांतील बहुतेक सर्वांचा सुसंगत उलगडा आता उपलब्ध होत असून, तो लक्षात घेता महाभारतकथेचे एक प्रचंड, अतिशय सूक्ष्म परंतु पूर्णपणे सुसंगत चित्र आपल्या समोर उभे राहत आहे. या विषयाचे मी गेल्या सुमारे तीन वर्षांत दिल्लीच्या शास्त्री राष्ट्रीय संस्कृत विद्यापीठापासून प्रारंभ करून, इन्दूर विश्वविद्यालय, उज्जैनीचे विक्रम विश्वविद्यालय, नागपुरस्थित विदर्भ साहित्य संघ व विदर्भ संशोधन मंडळ, मुंबईचा मराठी साहित्य संघ, पुण्याचे 'केसरी' कार्यालय, गोव्याची संस्कृतप्रचारिणी सभा, आणि त्याशिवाय कल्याण, सातारा, अमरावती, खांडवा इत्यादि स्थानीं विद्वज्जनांच्या उपस्थितीत व्याख्यानांच्या द्वारे, व आकाशवाणीवरून मराठी, हिंदी व इंग्रजी भाषणांच्या द्वारे प्रतिपादन केले आहे. त्यांत मी युद्धपूर्व (म्हणजे राज-सूय यज्ञ व वनवास यांच्या प्रारंभापासून अज्ञातवाससमाप्ति व उत्तरा—अभिमन्यु विवाहापावेतो ) आणि युद्धकालीन ( म्हणजे श्रीकृष्णाची शांतिवार्ता व युद्धारंभ यापासून भीष्मनिधनापावेतो) कूटांचे स्पष्टीकरण करून महाभारतकथेतील कांही अत्यंत महत्त्वाच्या तिथ्या निश्चित करून दाखविल्या आहेत.

हे सारे विवेचन संपूर्ण प्रमाणांसहित ग्रंथरूपाने लिहून तयार असून त्याच्या प्रकाशनाची खटपट चालू आहे. यादरम्यान या लेखात महाभारतयुद्धकालविषयक प्रमुख निष्कर्ष वाचकांच्या समोर संक्षेप रूपाने ठेवीत आहे. परंतु तत्पूर्वी दीर्घकालापासून गूढ होऊन बसलेल्या ज्या युद्धकालीन कूटांचा उलगडा आता प्राप्त होत आहे त्याचा काहीसा परिचय इष्ट होईल.

## २

## प्रमुख कूटे

### युद्धारंभतिथी

पांडवांच्या तर्फे स्वतः श्रीकृष्णांनी हस्तिनापुरी जाऊन केलेली अंतिम शांतिवार्ता दुर्योधनाच्या दुराग्रहामुळे भंग झाल्यावर त्याच दिवशी त्यांनी हस्तिनापुरातच युद्धारंभार्थ आगामी अमावास्येची कर्णाजवळ स्पष्ट घोषणा केली. महाभारतात त्यासंबंधात पुढील श्लोक आहे—

सप्तमात् चापि दिवसात् अमावास्या भविष्यति ।
संग्रामो युज्यतां तस्यां तामाहुः शक्रदेवताम् ।।
(उद्योगपर्व, १४२–१८)

घोषणादिनापासून ती अमावास्या सात दिवस पुढे होती. पौर्णिमान्त मासपद्धतीनुसार ती अमावास्या मार्गशीर्षाची व अमावास्यान्त पद्धतीप्रमाणे कार्त्तिकाची म्हटली जाईल.[२] त्या अमावास्येला कौरवपांडवयुद्ध

२. दोन्ही पद्धतींप्रमाणे शुक्ल पक्ष तोच येतो; पण कृष्णपक्षात मात्र एक महिन्याचा फरक येतो. भारतवर्षात विभिन्न प्रांतात या पद्धति प्रचलित आहेत. महाभारत काव्याची कालगणना कोणत्या मासपद्धतीप्रमाणे आहे, हेही एक कूटच आहे. स्थूल दृष्टीने पाहता काही वचने एक पद्धती तर कांही वचने दुसरी पद्धती दर्शवितात. परंतु प्रस्तुत

[ पुढील पानावर



खरोखर प्रारंभ झाले नाही, असे महाभारतात कोठेही म्हटले नाही. आणि युद्धारंभदिवशीच अर्जुनाला गीतोपदेश सांगितला गेला हे तर निर्विवादच आहे. अर्थात् हे उघडच आहे की, स्वतः श्रीकृष्णांच्याच वचनानुसार गीतोपदेश उक्त अमावास्येलाच झाला. पण मग गीताजयंती त्या अमावास्ये ऐवजी अकरा दिवस नंतर मार्गशीर्ष शुक्ल एकादशीला साजरी करण्याची परंपरा कशी प्रचलित झाली ?

मौज अशी आहे की, महाकवीने आपल्या कूटरचनेच्या ओघात पुढे जाऊन असेही म्हटले आहे की, जयद्रथवधाच्या (म्हणजे लढाईच्या चौदाव्या) दिवशी उत्तररात्री चन्द्रोदय झाला होता. असा चन्द्रोदय एखाद्या कृष्णपक्षाच्या दुसऱ्या आठवड्यातच शक्य आहे. आता महाभारताच्या अभ्यासकांसमोर प्रश्न असा उभा राहिला की, अमावास्येला युद्धारंभ मानून लागोपाठ चौदावा दिवस शुक्लपक्षाच्या शेवटीच येईल; कृष्णपक्षाच्या दुसऱ्या आठवड्यांत देणे शक्य नाही. या अडचणीतून सुटण्यासाठी कांही विद्वान वरील अमावास्येऐवजी मार्गशीर्ष शुक्ल एकादशीला (किंवा तिच्या आसपास) युद्धारंभाची म्हणजेच गीताजयंतीची तिथि मानू लागले. तसे केले म्हणजे तेथून लागोपाठ चौदावा दिवस कृष्णपक्षाच्या उत्तरार्धात येऊन उपरोक्त चन्द्रोदय बरोबर सिद्ध होतो. पण खुद्द महाभारत काव्यात या अशा वैकल्पिक तिथीचा काहीही उल्लेख नाही. किंबहुना त्यायोगे वरील स्पष्ट श्रीकृष्णवचनाचा अनादर होऊन, पुढे भीष्मनिधनतिथीचे विलक्षण कूटही उलगडत नाही. याउलट दुसरे काही विद्वान (उदाहरणार्थ, नागपूरचे विद्वद्रत्न डॉ.

मागील पानावरून ]

लेखकाचा विश्वास आहे की, महाभारताच्या रचयित्याने मूलतः अमावास्यान्त पद्धतीच अनुसरली आहे असे सूक्ष्म अध्ययनाने सिद्ध होते. मात्र मौज अशी की, त्याविषयी संदिग्धता निर्माण करण्यासाठी महाभारतकार प्रायः कृष्णपक्षाच्या उल्लेखात महिन्याचा उल्लेख टाळतात! या प्रश्नाच्या निश्चित उत्तराचे महत्त्व वाचकांना सांगावयास नकोच; त्यावरून महाकवीचे भारतवर्षातील निश्चित निवासस्थान आणि कालखंड यांवर प्रकाश पडतो.

के. ल. दप्तरी[३], मुंबईचे महामहोपाध्याय डॉ. पां. वा. काणे[४] इत्यादि) अमावास्येलाच युद्धारंभ मानतात पण चौदाव्या युद्धदिवसाच्या चन्द्रोदय-वर्णनाला अनधिकृत (इन्टरपोलेशन) मानून आपले समाधान करून घेतात. परन्तु त्या वर्णनाला मूळ महाभारतातून बहिष्कृत करण्यासही पुरेसे कारण आढळत नाही. अशा प्रकारे जरी व्यवहारात प्राय: सर्वत्र गीताजयंती एकादशीला साजरी होत राहिली असली आणि होत आहे, तरी विद्वानांच्या समोर युद्धारंभतिथी एक मोठेच कूट होऊन बसली होती.[५]

## बलरामाची तीर्थयात्रा

यानंतर बलरामाच्या तीर्थयात्रेच्या दिवसांचे कोडे पहा. कौरव-पांडवांचे आपसांतले स्वजनयुद्ध बलरामांना मुळीच पसंत नव्हते. त्यांनी श्रीकृष्णालाही त्या युद्धात कोणत्याही प्रकारे भाग न घेण्याबद्दल समजाव-

३. पाहा *The Astronomical Method and its Application to the Chronology of Ancient India* (नागपूर विश्वविद्यालयात दिलेली व्याख्याने), १९४२; विशेषत: पृ. १२५–१२९.

४. *History of Dharmaśāstra*, Vol III, pp 907-915.

५. पाहा. "The fight over the date of the Mahābhārata war is raging as stiff and furious as the Mahābhārata war itself. But without winning this fight we cannot capture the citadel of Ancient Indian Chronology. We must, therefore, exert all our efforts to win it". –Dr Daftari (above-quoted book, p 13). "The whole of Indian history depends upon the date of the Mahābhārata war, for the dates of accession of kings of the various Hindu dynasties are invariably calculated in all our purāṇas and other works of authority from the time of Mahābhārata war". –T. S. Narayan Shastri (quoted by Professor K. Srinivasa Raghavan in *The Date of the Mahābhārata War and the Kali Yugādi*, 12).



ण्याचा प्रयत्न केला. पण श्रीकृष्ण जरी प्रत्यक्षत: लढणार नव्हते तरी अर्जुनाचे सारथ्य करण्याचे त्यांनी मान्य केले होते. श्रीकृष्णांनी बलरामाचे म्हणणे कबूल न केल्यावर बलरामांनी तत्काल सरस्वती नदीच्या तीरावर तीर्थयात्रा प्रारंभ केली. ज्या दिवशी श्रीकृष्ण हस्तिनापुराला युद्धारंभतिथीची घोषणा करून तावडतोब उपप्लव्याला पांडवांकडे परतले त्याच दिवशी ही तीर्थयात्रा प्रारंभ झाली. बलरामाची पांडव व श्रीकृष्ण यांच्याशी त्याच दिवशी उपप्लव्याला भेट झाली. महाभारतात स्पष्ट म्हटले आहे की ही यात्रा पुष्य नक्षत्रावर प्रारंभ होऊन बेचाळीसाव्या दिवशी युद्धाच्या शेवटच्या तिथीला भीम-दुर्योधन-गदायुद्धाच्या समयी चन्द्र श्रवण नक्षत्रात असता समाप्त झाली. यासंबंधी स्वत: बलरामाचे पुढील वचन आहे.

चत्वारिंशद् अहान्यद्य द्वे च मे नि:सृतस्य वै ।
पुष्येण संप्रयातोऽस्मि श्रवणे पुनरागत: ।।
(शल्यपर्व, ३४/६)

यात्रेचे हे बेचाळीस दिवस आतापावेतो कूट होऊन बसले होते. यात्रा अमावास्येच्या सात दिवस पूर्वी प्रारंभ झाली होती. म्हणून जे भाष्यकार त्या अमावास्येवरच युद्धारंभ मानीत होते, ते त्या युद्धपूर्व सात दिवसांत त्यांच्या परंपरागत कल्पनेनुसार युद्धकालाचे अठरा दिवस मिळवत राहिले. पण त्यायोगे तीर्थयात्रेचे एकूण पंचवीसच दिवस सिद्ध होतात, आणि बलराम तर स्वत: बेचाळीस दिवस म्हणत आहेत. बरे, मार्गशीर्ष शुक्ल एकादशीला युद्धारंभ मानला तरी पंचवीसात आणखी केवळ अकराच दिवस जोडले जाऊन एकूण छत्तीसच दिवस येतात, बेचाळीस नव्हे! याच प्रमाणे बलरामवचनात निर्दिष्ट नक्षत्रांचाही हिशेब बरोबर बसत नव्हता; कारण पुष्यापासून श्रवण न पंचवीस स्थाने दूर आहे न छत्तीस! शेवटी डॉ. दप्तरींनी (पाहा, पूर्वोल्लिखित, पृ. ७ व ११७) अशीही सूचना केली की, बलरामाच्या त्या वचनात पुष्याच्या जागी श्रवण व श्रवणाच्या जागी पुष्य वाचावे; कारण असे की, श्रवणापासून पुष्य पंचवीस स्थाने दूर असून डॉ. दप्तरींच्या गणने-

प्रमाणे बलराम यात्रेचे तितकेच दिवस होतात. पण इतके करूनही त्याच श्लोकाच्या पहिल्या ओळीत बेचाळीस दिवसांचा अगदी स्पष्ट उल्लेख आहे त्याचे काय? आणि शिवाय, यात्रारंभदिनाच्या पुष्य नक्षत्राचा उल्लेख बलरामाच्या त्या वचनाव्यतिरिक्तही महाभारतात अन्य अनेक स्थळी आहे; त्या सर्वच जागी पुष्याऐवजी श्रवण वाचावयाचें की काय? आणखी एक लेखक, राजस्थानचे ज्योतिर्विद पंडित देवकीनंदन खेडवाल, बलरामतीर्थयात्रेचे दिवस बेचाळिसांऐवजी अडतीसच मोजून आपला हिशेब जमवू पहातात![6]

## काही अन्य कूटे

युद्धसमाप्तीनंतर विजयी पांडवांनी एकदम हस्तिनापुरात प्रवेश केला नाही. अत्यंत धर्मनिष्ठतेने त्यांनी प्रथम युद्धात मेलेल्या उभय पक्षांकडील योद्धयांची विधिवत् अन्त्येष्टिक्रिया केली. आणि तदनंतर नगराच्या बाहेर नदीतटावर एक पूर्ण महिना आशौचपालनात व्यतीत केला. महाभारतात त्याचा पुढील स्पष्ट उल्लेख आहे–

तत्र ते सुमहात्मानो न्यवसन् पाण्डुनन्दनाः ।
शौचे निवर्तयिष्यन्तो मासमात्रं बहिः पुरात् ।।
(शांतिपर्व, १–२)

परंतु युद्धकालीन गूढ कालगणना ध्यानी न आल्याने या एक महिन्याचा हिशेब न लागून, आशौचपालनाचे युद्धोत्तर केवळ बाराच दिवस मोजण्याचा प्रयत्न प्रसिद्ध भाष्यकार आचार्य नीलकंठ, पुण्याचे डॉ. बेलवलकर[7] आदि अनेक प्राचीन व अर्वाचीन विद्वान करीत राहिले!

---

६. "भारतीय कालगणना" (हिंदी), पृ. १३०.

७. *The Mahābhārata* (published by Bhandarkar Oriental Institute, Poona), Vol XVII, Part I, Introduction LXXXVI, footnote 2.



अशाच प्रकारे तीक्ष्ण बाणांच्या शरशय्येवर महात्मा भीष्माचार्यांनी जो महान धर्मोपदेश केला त्याचे विस्तृत वर्णन शांतिपर्वात व अनुशासनपर्वात आले असून, त्याचे निश्चित दिवसही आतापावेतो विवाद्य होऊन बसले होते. काही जणांनी तर त्या साऱ्या उपदेशाला प्रक्षिप्त (इन्टर्‌पोलेशन) मानावे असाही विचार व्यक्त केला आहे. परन्तु भीष्मांचे ते अनुपम प्रवचन मूळ महाभारताचाच भाग असून, त्याचे निश्चित दिवस, किंबहुना तिथ्याही, सूचित करणारे सूक्ष्म संकेत देखील महाकवीने महाभारतांत ठेविले आहेत. वाचकांना या लेखाच्या शेवटी ते नक्की दिवस दिलेले आढळून येतील.

## भीष्मनिधनतिथीची गहन समस्या

शेवटी भीष्मनिधनाची अत्यंत महत्त्वपूर्ण तिथी तर फारच कूट होऊन बसली होती. या तिथीचा एका विशेष मूलभूत कालगणनात्मक संकेताशी संबंध आहे. पहा की, महाभारतात सांगितल्याप्रमाणे भीष्मनिधन त्या वर्षीच्या उत्तरायणप्रारंभसमयी झाले होते. म्हणून त्या निधनाची वास्तविक तिथी महाभारतयुद्धाचे प्रत्यक्ष (किंवा निदान महाकवीने आपल्या मनात संकलिपलेले) वर्ष निश्चित करण्यासाठी फार महत्त्वपूर्ण आहे. लढाईच्या दहाव्या दिवशी संध्याकाळचे सुमारास भीष्मांचे रणक्षेत्रावर पतन झाले. पण ते इच्छामरणी असल्याने उत्तरायणप्रारंभाच्या शुभमुहूर्तापावेतो प्राणधारण करण्याचे त्यांनी ठरविले. भीष्मांच्या या शरशय्येच्या दिवसांतच शेष युद्ध लढले गेले, आशौचपालनाचा एक मास गेला, युधिष्ठिराला हस्तिनापुरात राज्याभिषेक झाला, आणि त्यानंतर स्वतः भीष्मांचा महान धर्मोपदेशही झाला. या सर्व घटना झाल्यावर जेव्हा भीष्मांच्या प्राणविसर्जनाचा काळ प्राप्त झाला, तेव्हा ती तिथि व प्रत्यक्ष वेळही सूचित करणारे त्यांचे स्वतःचे पुढील कूटोद्‌गार आहेत–

अष्टपंचाशतं राज्यः शयानस्याद्य मे गताः
शरेषु निशिताग्रेषु यथा वर्षशतं तथा ।।

माघोऽयं समनुप्राप्तो मासः सौम्यः युधिष्ठिर ।
त्रिभागशेषः पक्षोऽयं शुक्लो भवितुमर्हति ॥
(अनुशासनपर्व, १६७-२७,२८)

"तीक्ष्ण अग्रांच्या बाणांवर शयन करीत माझ्या आता अठ्ठावन रात्री गेल्या आहेत; हा इतका वेळ शंभर वर्षांसमान प्रतीत झाला. युधिष्ठिरा, माघाचा हा सौम्य मास प्राप्त झाला असून पक्ष शुक्ल आहे; आणि तो (म्हणजे, काही भाष्यकारांच्या मताने माघ मास, आणि अन्य काही विद्वानांच्या मतानुसार तो शुक्ल पक्ष) या समयी त्रिभागशेष आहे." येथे मी 'त्रिभागशेष' शब्दाचे स्पष्टीकरण मुद्दामच केले नाही; कां की त्यातच व्यासांनी एक विलक्षण कूट ठेवले आहे. साधारणपणे त्या शब्दाचा अर्थ 'ज्याचा तीन चतुर्थांश भाग अद्याप शेष आहे' असा केला जातो.

भीष्मांच्या या उद्‌गारात शरशय्येच्या अठ्ठावन रात्री, माघ महिना व शुक्ल पक्ष यांचा स्पष्ट उल्लेख आहे. पण प्राचीन आणि अर्वाचीनही विद्वानांच्या अनेकानेक स्पष्टीकरणांत एक तर शरशय्येच्या या अठ्ठावन रात्री पूर्ण मोजल्या जात नव्हत्या; किंवा कसेही करून त्यांची मोजणी पूर्ण केली तर तिकडे निधनसमयी शुक्लपक्षाऐवजी कृष्णपक्ष येत होता. प्रथम मार्गशीर्ष शुक्ल एकादशीला युद्धारंभ मानणाऱ्यांचा हिशेब पाहा. यांच्या मोजणीप्रमाणे युद्धाचा लागोपाठ दहावा दिवस पुढील कृष्ण-पक्षाच्या पंचमीला येतो; त्या दिवशी भीष्माचे रणभूमीवर पतन झाले. आता तेथून अठ्ठावन रात्री मोजल्या म्हणजे भीष्मनिधन दोन महिन्यांनंतरच्या कृष्णपक्षांत येते. (अमावास्यान्त मासपद्धति गृहीत धरून तो कृष्णपक्ष माघ महिन्याचा असेल). पण स्वतः भीष्म शुक्ल पक्षाचा स्पष्ट उल्लेख करीत आहेत. या अडचणीतून सुटण्यासाठी प्रसिद्ध निळकंठाचार्यांप्रमाणे काही भाष्यकार शरशय्येच्या एकूण रात्री कशा तरी कमी करून भीष्मनिधन शुक्ल पक्षात आणून बसविण्याचा प्रयत्न करितात.[८] तर दुसरे

---

८. या साठी आचार्य नीलकंठ प्रथम 'अष्टपंचाशतं' चा विग्रह 'अष्टपंच+अशतं' असा करितात; आणि मग 'अशतं' चा अर्थ 'शंभराहून

[ पुढील पानावर



काही लेखक, त्या रात्रींची संख्या कमी न करिता, त्यांची मोजणी युद्धाच्या ~~दहाव्या~~ पहिल्या दिवसा पासूनच प्रारंभ करू चाहतात.[९] आणखी इतर काही विद्वान (ज्यांत पुण्याच्या प्रसिद्ध भांडारकर प्राच्य संशोधन संस्थेचे संपादकही[१०] समाविष्ट आहेत) सर्व अठ्ठावन रात्री मोजून माघ कृष्ण पक्षात पोहोचतात, आणि मग तेथे कृष्णपक्षालाच शुक्लपक्ष मानावे असा विलक्षण आग्रह धरतात !

---

मागील पानावरून ]

कमी' असा करून 'अष्टपंच' अर्थ त्यांतील दोन संख्यांचा क्रम उलटा करून पांचावर आठ म्हणजे अठ्ठावन करितात. या प्रमाणे अष्टपंचाशतं' चा एकंदर अर्थ 'शंभरात अठ्ठावन कमी' अर्थात् बेचाळिस असा होतो! आतां नीलकंठाच्या मतानुसार युद्धारंभ तिथि मार्गशीर्ष शुक्ल पक्षाची ठीक एकादशी नसून त्रयोदशी (वा चतुर्दशी) आहे. या गणनेने त्यांच्या मता-प्रमाणे भीष्मपतनाची तिथि त्यानंतरची कृष्ण अष्टमी येते; तेथून बेचाळिस रात्री मोजून नीलकंठ भीष्मनिधन तिथि माघ शुक्ल पंचमीवर आणून ठेवतात. पण इतके करूनही त्या पंचमीला तो शुक्लपक्षही 'त्रिभागशेष' म्हणतां येत नाही आणि माघ महिनाही 'त्रिभागशेष' म्हणता येत नाहीं म्हणून मग ते त्याचा अर्थ 'त्रिभागमात्र' म्हणजे 'ज्याचा एक तृतीयांश भाग व्यतीत होऊन चुकला आहे' असा करून, त्याचा सबंध शुक्लपक्षाशी जोडू पाहतात. मात्र महाभारतावरील आपल्या भाष्यांत इतरत्र कांही स्थळी नीलकंठ भीष्मनिधन तिथीसाठी परंपरागत माघ शुक्ल अष्टमीचाही उल्लेख करितात.

९. पाहा, प्रो. राघवन् याचे पूर्वोल्लिखित पुस्तक, पृ. १९; आणि महामहोपाध्याय पंडित गिरिधर शर्मा चतुर्वेदी कृत "गीताप्रवचन-गीताव्याख्यान-माला" (हिन्दु विश्वविद्यालय, नेपाळ राज्य संस्कृत ग्रंथमाला) खंड ४, १९६२, पृ. ७९-८५.

१०. पाहा, भांडारकर संस्थेचे *Mahābhārata*, Vol XVII Anuśāsana Parva, Part I, Introduction, pp. LXXXIII, f. या मतानुसार भीष्मनिधनतिथी माघ कृष्ण चतुर्थी असून, त्या दिवशी तो कृष्ण पक्ष 'त्रिभागशेष' (तीन चतुर्थांश शेष) म्हणता येतो.

तिकडे, जे श्रीकृष्णवचनानुसार अमावास्येलाच युद्धारंभ मानीत राहिले त्यांच्या हिशेबाने भीष्मपतनदिन अर्थात् शरशय्याप्रारंभ मार्गशीर्ष शुक्ल नवमीला येतो. तेथून अठ्ठावन रात्री मोजल्या तर माघ शुक्ल अष्टमीला भीष्मनिधन दाखविणे आपल्यास शक्य आहे. आणि त्या दिवशी तो शुक्लपक्ष सोडला तरी निदान माघमास 'त्रिभागशेष' म्हटलाही जाऊं शकतो; कारण तेव्हा त्याचा एक आठवडा संपून तीन बाकी होते; (अर्थात् यासाठी आपण पुन: अमावास्यान्त मासपद्धति मानली पाहिजे). याच आधारावर अनेक भारतीय पंचांगात भीष्मनिधनतिथि माघ शुक्ल अष्टमीला दाखविलीही जाते.[11] पण यांत अडचण अशी की, या गणनेनुसार लढाईचा चौदावा दिवस शुक्लपक्षाच्या शेवटी येऊन त्याच्या उत्तररात्री चन्द्रोदय संभवत नाही.

शेवटी वाराणसीचे पंडित महामहोपाध्याय गिरिधरशर्मा चतुर्वेदी[12]

११. आणि आश्चर्याची गोष्ट अशी की, विसंगतीची काहीही चिंता न करिता याच पंचांगात गीताजयंती अमावस्येच्या ऐवजी मार्गशीर्ष शुक्ल एकादशीला दाखविली जाते ! भीष्मनिधनतिथीच्या संबंधात माघ शुक्ल अष्टमीचा एक फार प्राचीन उल्लेख 'भारतसावित्री' (जी एक लहानशी अनामिक संस्कृत पद्यरचना आहे) च्या 'माघमासे सिताष्टमी' या शब्दांमध्ये आढळतो. परंतु स्वत: 'भारतसावित्री'त भीष्मांचे रणभूमीवर पतन मार्गशीर्ष पौर्णिमेनंतर येणाऱ्या कृष्ण सप्तमीला दाखविले आहे; आणि तेथून माघ शुक्ल अष्टमीपावेतो अठ्ठावन रात्री पूर्ण होत नाहीत. यासाठी कधीकधी त्या वचनात 'सिताष्टमी' च्या पूर्वी अवग्रह मानून 'असिताष्टमी' देखील मानले जाते. परंतु मग महाभारतात शुक्लपक्षाचा जो स्पष्ट उल्लेख आहे त्याच्याशी त्याचा विरोध येतो. वस्तुत: 'भारतसावित्री'चे मूळ शब्द निश्चित करणे अत्यंत कठीण आहे; त्यातील श्लोक अधिकांशत: अन्य कृतींमध्ये उद्धृत केलेले उपलब्ध होतात (पाहा *History of Dharmaśāstra* by Dr. Kane, Vol. III, pp. 909–10, footnote 1773).

१२. पूर्वोल्लिखित.



निष्कर्ष काढतात की, या गहन कूटाचा पूर्ण उलगडा असंभवनीय असून महाभारतातील या संख्यानिदर्शक गूढ श्लोकांत आतापावेतो नीट ध्यानात न आलेली काही तरी गुप्त परिभाषा योजिलेली असावी, किंवा पोथीलेखकांच्या प्रमादाने त्यात काही चुका प्रविष्ट झाल्या असाव्या. अशाच प्रकारे महाराष्ट्राचे भारताचार्य चिंतामणराव वैद्यही लिहितात, "भारतीय युद्ध मार्गशीर्ष शुद्ध १३ स सुरू झाले असे धरले तर, भीष्म मार्गशीर्ष वद्य ८ ला पडले आणि तेव्हापासून अठ्ठावन रात्री मोजल्या तर माघ वद्य ८ येते, हे कोडे काय आहे ?....हा विरोध कसा ? याचा परिहार होणे बहुतेक अशक्यच आहे. युद्ध मार्गशीर्षात न मानता श्रीकृष्णाच्या म्हणण्याप्रमाणे कार्तिक अमावास्येस सुरू झाले असे मानले तर सगळाच घोटाळा होतो....जयद्रथाच्या वधाच्या दिवशी पहाटेस चन्द्र उगवू शकत नाही. त्या दिवशी बहुतेक पौर्णिमा किंवा शुद्ध त्रयोदशी येते, म्हणजे पहाटेस उलटा चन्द्राचा अस्त होऊन काळोख होणार; मार्गशीर्ष शुद्ध ८ युद्धारंभ मानला तर ५८ दिवस येतील, पण त्या दिवशीच्या नक्षत्रापासून १८ व्या दिवशी बळरामाच्या वचनाप्रमाणे श्रवण नक्षत्र येणार नाही......असो. तर हा सर्व घोटाळा या अनुशासनपर्वातील ५८ रात्री व ५० रात्रींच्या वचनांनी केला आहे. माघ वद्यात शुक्ल पक्ष पंचमीपर्यंत मानता येईल; पण त्रिभागशेष पक्ष म्हणता येणार नाही. अठ्ठावन रात्री म्हणजे सरासरी दोन महिने होतात. तेव्हा माघ वद्य ८ मीच येणार आहे. असो काही एक खोटे मानावे लागणार आहे. युद्धपर्वातील वचने तरी खोटी, नाही तर ही अनुशासनपर्वातील खोटी, असा हा अपरिहार्य विरोध आहे, हे मानावे लागते".[13] अशाच स्वरूपाचा निष्कर्ष डॉ. काणे (पाहा पूर्वोल्लिखित) आदींनीही काढला आहे.

१३. पाहा, 'महाभारताचा उपसंहार' पृ. १२७–१२८.

## ३

# कूटांची उत्तरे

## एक महान रहस्य

परंतु माझा असा नम्र आत्मविश्वास आहे की आता या व इतरही कित्येक कालगणनात्मक कूटांचा पूर्ण उलगडा प्राप्त झाला आहे. यात एक महत्त्वाचे रहस्य असे आहे की महाभारत काव्याच्या कर्त्याने दिलेले विस्तृत युद्धवर्णन प्रत्यक्ष लढाई एक एक दिवसाच्या अंतराने होण्याच्या गुप्त कल्पनेवर रचलेले आहे. याच आधाराने महाकवीने युद्धकालातील दिवसांची व तिथ्यांची गणना केली; परंतु अत्यंत कुशलतेने संदिग्ध शब्दरचनेच्या गुंतावळ्यात ते रहस्य लपवून ठेवले. मात्र तरीही महाभारताच्या श्लोकांतच त्याची मार्मिक प्रमाणेही त्यांनी ठेविली असून सूक्ष्म अध्ययनाने ती उपलब्ध होतात.

लढाईच्या प्रतिदिवशी उभय सैन्यांची जी नवनवी व्यूहरचना होत असे त्याची माहिती, व्यूहांच्या विशिष्ट नावांसह, महाकवीने दिली आहे. पांडवांनी लढाईच्या दुसऱ्या दिवशी आपल्या सेनेची रचना 'क्रौंचारुण' व्यूहात, तिसऱ्या दिवशी 'अर्धचन्द्राकार' व्यूहात, पाचव्या दिवशी 'श्येन' व्यूहात, सहाव्या दिवशी 'मकर' व्यूहात, सातव्या दिवशी 'वज्र' व्यूहात, आठव्या दिवशी 'शृंगाटक' व्यूहात, अकराव्या दिवशी 'क्रौंच' व्यूहात, आणि बाराव्या दिवशी 'मंडलार्ध' व्यूहात केली होती. उलट कौरव सेनेचा व्यूहप्रकार तिसऱ्या दिवशी 'गरुड', चवथ्या दिवशी 'व्याल', पाचव्या दिवशी 'मकर', सहाव्या दिवशी 'क्रौंच', सातव्या दिवशी 'मंडल', आठव्या दिवशी एक 'विशाल घोर महाव्यूह', नवव्या दिवशी 'सर्वतोभद्र', अकराव्या दिवशी 'शकट', बाराव्या दिवशी द्रोणांच्या आधिपत्याखाली रणभूमीच्या एका क्षेत्रात 'गरुड' व सुशर्माच्या नेतृत्वाखाली दुसऱ्या भागांत 'चन्द्राकार रथव्यूह', आणि तेराव्या दिवशी अभिमन्यूच्या मृत्यूस कारणीभूत होणारा सुप्रसिद्ध 'चक्रव्यूह' होता. दोन्ही



सैन्ये अत्यंत विशाल होती. आणि प्रतिदिवशी लढाईला प्रारंभ सूर्योदयावर (व एक दोनदा तर त्याच्याही काही पूर्वी) होत असे. दर दिवशी लढाई संपल्यावर या प्रचंड व्यूहरचनांचे पूर्वाभ्यास (रिहर्सल्स्) उघडच आवश्यक होते; अन्यथा लढाईच्या पुढल्या दिवशी सुरवातीपासूनच सैन्ये तत्काल इच्छित रचनेनुसार रणक्षेत्रावर तयार उभी राहू शकली नसती. आता, हे असे पूर्वाभ्यास मधल्या अवकाश दिनाशिवाय अन्य कोणत्या समयी होऊ शकले असते? पुऱ्या दिवसभराच्या घनघोर लढाईने अत्यंत थकलेली सेना त्याच रात्रीच्या वेळी अशा प्रकारचे पूर्वाभ्यास करून पुनः सूर्योदयावर लढाईसाठी उभी राहणे संभवनीय मानता येईल काय? याच अवकाशदिनांत योद्धयांना आवश्यक विश्रांति व वैद्यकीय उपचारही प्राप्त होऊन, युद्धात कामी येणाऱ्या सैनिकांमुळे दररोज आवश्यक होणारी फौजेच्या तुकडयांची पुनर्रचनाही होत असली पाहिजे.

याशिवाय असे पहा की भीष्मपतनानंतर द्रोणाचार्य कौरवसेनापति झाले; आणि द्रोणांनंतर कर्ण व त्याच्यानंतर शल्य सेनापति झाला. महाभारतकारांनी सैन्याच्या समक्ष त्यांना झालेल्या विधिवत् अभिषेकांची विस्तृत वर्णने सहेतुक दिली आहेत. द्रोणांच्या अभिषेकाचे वर्णन असे आहे—

अथाभिषिषिचुर्द्रोणं दुर्योधनमुखा नृपाः ।
सैनापत्ये यथा स्कंदं पुरा शक्रमुखाः सुराः ॥ द्रोणपर्व, ७–६ ॥

ततो वादित्रघोषेण शंखानां च महास्वनैः ।
प्रादुरासीत्कृते द्रोणे हर्षः सेनापतौ तदा ॥ ७ ॥

ततः पुण्याहघोषेण स्वस्तिवादस्वनेन च ।
संस्तवैर्गीतशब्दैश्च सूतमागधवन्दिनाम् ॥ ८ ॥

जयशब्दैर्द्विजाग्र्याणां सुभगावर्तितैस्तथा ।
सत्कृत्य विधिना द्रोणं मेनिरे पाण्डवाञ्जितान् ॥ ९ ॥

याचप्रमाणे कर्णालाही अभिषेक झाला--

सैनापत्येन सत्कर्तुं कर्णं स्कन्दमिवामरा: ।
ततो ऽभिषिषिचु: कर्णं विधिदृष्टेन कर्मणा ।। कर्णपर्व, १०।४३ ।।
दुर्योधनमुखा राजन् राजानो विजयैषिण:
शातकुम्भमयै: कुम्भैर्माहेयैश्चाभिमन्त्रितै: ।। ४४ ।।
तोयपूर्णविषाणैश्च द्विपखड्गमहर्षभै: ।
मणिमुक्तायुतैश्चान्यै: पुण्यगन्धैस्तथौषधै: ।। ४५ ।।
औदुम्बरे सुखासीनमासने क्षौमसंवृते ।
शास्त्रदृष्टेन विधिना सम्भारैश्च सुसम्भृतै: ।। ४६ ।।
ब्राह्मणा: क्षत्रिया वैश्यास्तथा शूद्राश्च सम्मता: ।
तुष्टुवुस्तं महात्मानमभिषिक्तं वरासने ।। ४७ ।।

हे असे अभिषेक उपरोक्त अवकाशदिनाशिवाय इतर केव्हा होऊ शकले असते[१४]? लढाईच्या दोन दिवसांच्या मध्यंतरी रात्रीच्या समयी अत्यंत थकलेल्या व निद्रावश सैन्याला अत्यावश्यक विश्रांतीपासून वंचित करून, ते अभिषेक झाले नसले पाहिजेत हे काय सांगावयास पाहिजे ? संजयाने पहिला युद्धवृत्तांत धृतराष्ट्राला भीष्मपतनानंतर कथन केला. त्यात लढाईच्या पहिल्या दहा दिवसांपावेतोचे वृत्त होते. ते सांगण्यासाठी संजय रणभूमीवरून हस्तिनापुरी गेला होता. ह्याच वृत्तांतात विश्व-प्रसिद्ध गीतासंवादही अतंर्भूत होता. गीतेचे ते प्रथम प्रकाशनही म्हटले जाऊ शकते. हा वृत्तांत संजयाने भीष्मपतनानंतर येणाऱ्या अवकाशदिनी धृतराष्ट्राला सादर केला[१५]; आणि नंतर तो ताबडतोब पुढल्या दिवशीच्या लढाईत उपस्थित होण्यासाठी कुरुक्षेत्रास परत आला.

लढाईत प्रतिदिवशी कुरुक्षेत्राची ती रणभूमि असंख्य मानवी व पाशवी मृतदेहांनी आणि त्याचप्रमाणे रथशस्त्रांदींनी खचाखच भरून

१४. महाभारताच्या श्लोकांत याचे पुरेसे प्रमाण आहे.

१५. याचेही महाभारतात मार्मिक प्रमाण आहे.



जात असे. त्याची स्पष्ट सूचना महाभारतात जागोजागी दिलेली आहे. त्याची साफसफाई केल्याशिवाय त्याच भूमीवर लागोपाठ दररोज लढाई कशी चालू राहिली असती ? सफाईचे काम (निदान कृष्णपक्षात) अवकाश-दिवशी फौजांच्या विश्रांतिसमयात होत असले पाहिजे हे मानणे युक्ति-संगतच होईल.

## अवकाशदिनांत एक अपवाद

जरी लढाईच्या प्रत्येक दिवसानंतर विश्रांतीचा एक दिवस येत असे, तरी त्यांत एक अपवादही होता. चवदाव्या आणि पंधराव्या दिवसांमध्ये अवकाशदिवस नव्हता. त्याचे कारणही महाभारतात दिले आहे. चौदाव्या दिवशी सायंकाळी अर्जुनाने आपली घोर प्रतिज्ञा पूर्ण करून सूर्यास्तापूर्वी जयद्रथवध केला. पण त्या दिवशी त्यानंतरही अंधाऱ्या रात्रीत लढाई चालूच राहिली. फार काय, मशाली जाळून युद्ध चालू राहिले. त्याचे मार्मिक वर्णन महाभारतकारांनी दिले आहे. पण मध्यरात्रीपावेतो दोन्ही सेना अत्यंत थकून गेल्या; आणि म्हणून केवळ दयेने प्रेरित होऊन अर्जुनाने प्रस्ताव केला की थोडा वेळ तरी लढणे बंद करून उभय सेनांनी रणक्षेत्रावरच कशीबशी विश्रांती घ्यावी, आणि उत्तररात्री चन्द्रोदय झाल्यावर त्याच्या प्रकाशात पुन: लढणे चालू करावे.[१६] कौरव सेनापति द्रोणाचार्यांनीही आपल्या सेनेची अवस्था व इच्छा पाहून ती सूचना मान्य केली. आणि अशा प्रकारे दोन्ही बाजूंच्या सैनिकांनी रणभूमीवरच अंग टाकून किंचित् काळ विश्रांती घेण्यास प्रारंभ केला. परंतु जयद्रथवधाने आधीच उद्विग्न झालेल्या कौरवाधिपती दुर्योधनाने शत्रुपक्षाचा असा विश्रांति-प्रस्ताव मान्य केल्याबद्दल द्रोणांना अत्यंत दोष दिला. इतकेच नव्हे तर त्यांच्या इमानदारीवरही संशय घेतला. यामुळे अतिशय

१६. वाचकांना स्मरतच असेल की, हा तोच चन्द्रोदय आहे, ज्याच्यामुळे युद्धारंभतिथि निश्चित करण्यात विद्वानांना अडचण पडत आहे.

व्यथित होऊन द्रोणाचार्यांनी प्रतिज्ञा केली की, आता लढाई चालू झाल्यावर ती पुन: कोणत्याही कारणाने मध्ये स्थगित न करिता मी अंतिम जय किंवा मृत्यू प्राप्त होईपावेतो लढणे चालू ठेवीन. ह्यामुळे चन्द्रोदयावर पुन: चालू झालेली ती लढाई सूर्योदयानंतरही अवकाशदिनाशिवाय पंधराव्या दिवशी तशीच चालू राहिली; आणि शेवटी त्या दिवशी द्रोणाचार्य रणक्षेत्रावर निधन पावले.

## अंतिम युद्धदिवस

पण अवकाशदिनांतील या एका अभावाची पूर्ती महाकवीने एका अन्य विलक्षण कूटकल्पनेने करून दिली. शल्यवधाच्याच दिवशी भीम-दुर्योधनांचे अंतिम गदायुद्ध होऊन दुर्योधन मारला गेला, अशी एक सर्वसाधारण समजूत आहे. काही श्लेषात्मक शब्दप्रयोगांच्या साह्याने महाभारतकारांनी हा आभास निर्माण केला आहे. परंतु तत्संबंधी श्लोकांच्या सूक्ष्म अध्ययनाने स्पष्ट होते की, गदायुद्ध शल्यवधाच्या दुसऱ्या दिवशी झाले. ज्या दिवशी मध्यान्हाच्या सुमारास शल्यवध झाला, त्या दिवशी तदनंतर कौरव सेना पूर्ण नष्टभ्रष्ट होऊन स्वत: दुर्योधन रणभूमी सोडून एका सरोवराच्या आंत जाऊन लपून बसला. नंतर त्या दिवशी सूर्यास्तानंतर, पूर्वरात्रिकाळात, पांडवांना कांही व्याधांच्या द्वारे त्याचा पत्ता लागला. ते सरोवराजवळ गेले; आणि दुर्योधनाला बाहेर येऊन युद्ध करण्याचे त्यांनी आव्हान दिले. दुर्योधन आतूनच प्रत्युत्तरे देत राहिला. बराच वेळ ही बोलाचाली चालू राहिली. आणि येथे रहस्य हे आहे की, शेवटी दुर्योधन पाण्याबाहेर येऊन भीमाशी गदायुद्ध करण्यासाठी उभा राहिला, तोपावेतो ती रात्र समाप्त होऊन दुसरा दिवस उजाडला होता. याच वेळी नारदाच्या आग्रहावरून बलराम तीर्थयात्रा संपवून भीम व दुर्योधन या आपल्याच दोन्ही शिष्यांचे गदायुद्ध पाहण्यासाठी तेथे येऊन पोचले. त्या दिवशी गदायुद्ध अंदाजे अर्धा दिवस चालून भीमाच्या प्रहाराने दुर्योधन खाली पडला. गदायुद्धाच्या त्या अर्ध्या दिवसाला शल्यवध-दिवशीच्या अर्ध्या दिवसाच्या लढाईत जोडून महा-



कवीने अत्यंत खुबीने प्रत्यक्ष लढाईच्या अंतिम अठराव्या दिवसाची मोजणी पूर्ण केली; आणि अशा प्रकारे आणखी एक विलक्षण कूट करून ठेवले !

गदायुद्धाच्या प्रारंभसमयीच्या वर्णनात रात्रीच्या समाप्तीला लपवून ठेवण्याशिवाय महर्षि व्यासांनी त्या दिवसाच्या संबंधात भ्रम निर्माण करण्यासाठी काही अन्य शाब्दिक कूटांचाही उपयोग केला आहे. शल्यपर्वाच्या सुरवातीस युद्धाच्या अखेरच्या दिवसांचा अत्यंत संक्षिप्त सारांश वैशंपायनाच्या तोंडी आलेला आहे. त्यात पुढील श्लोक आहेत.

ततः शल्यो महाराज कृत्वा कदनमाहवे ।
ससैन्योऽथ स मध्याह्ने धर्मराजेन पातितः ॥ १० ॥
ततो दुर्योधनो राजा हतबन्धू रणाजिरात् ।
अपसृत्य ह्रदं घोरं विवेश रिपुजाद् भयात् । ११॥
अथापराह्णे तस्याह्नः परिवार्य सुयोधनः ।
ह्रदादाहूय युद्धाय भीमसेनेन पातितः (शल्यपर्व १, १०-१२)

येथे पहिल्या दोन श्लोकात म्हटले आहे की, मध्यान्हीच्या वेळी धर्मराज युधिष्ठिराकडून शल्य मारला गेल्यानंतर दुर्योधन रणभूमि सोडून सरोवराच्या आत लपून बसला. त्यानंतर लागलीच येणाऱ्या वरील तिसऱ्या श्लोकाचा परंपरेनुसार असा अर्थ केला जातो की, त्याच दिवसाच्या (तस्याह्नः) अपराह्ण प्रहरीं (अपराह्णे) भीमाने दुर्योधनाला गदायुद्धांत मारून खाली पाडले. परंतु शल्यपर्वातच पुढे संजयाने जे विस्तृत वर्णन दिले आहे त्यावरून स्पष्ट होते की, शल्यवधाच्या दिवशी रात्रिप्रारंभापावेतो तर पांडवांना दुर्योधनाचा पत्ताही लागला नव्हता ! येथे शल्यवधाच्या दिवशी त्यानंतर घडलेल्या त्या घटनाक्रमाचा काही अधिक विचार उपयुक्त होईल. शल्यवधानंतर कौरव सेना पूर्णपणे नष्ट होऊन, स्वतः संजय (जो त्या युद्धात कौरवांकडून लढत असे) कैद झाला. परंतु त्या वेळी महर्षि व्यास तेथे उपस्थित होऊन त्यांच्या आदेशाने संजयाला सोडून देण्यात आले. त्यावर कवच-

रहित आणि शस्त्ररहित होऊन संजय हस्तिनापुराकडे निघाला. त्यावेळी 'सायाह्न' समय होता असे स्पष्ट म्हटले आहे.

**अनुज्ञातस्त्वहं तेन न्यस्तवर्मा निरायुधः ।**
**प्रातिष्ठं येन नगरं सायाह्ने रुधिरोक्षितः ।।**

(शल्यपर्व, २९–४१)

संजय एक कोस चालून गेल्यावर त्याला वाटेत दुर्योधन एकटा भेटला. त्या दयनीय अवस्थेत एकमेकांना पाहून दोघांनाही अत्यंत दुःख झाले. प्रथम त्यांच्या तोंडातून काहीही शब्द फुटेनासा झाला. नंतर संजयाने दुर्योधनाला लढाईच्या शेवटच्या क्षणांचा वृत्तांत सांगितला. तो ऐकल्यावर दुर्योधनाने धृतराष्ट्रासाठी संजयाजवळ एक निरोप दिला; आणि संजयाच्या समक्ष त्याने जवळच्याच द्वैपायन सरोवरात प्रवेश केला.

**एवमुक्त्वा महाराज प्राविशत् तं महाह्रदम् ।**
**अस्तम्भयत तोयं च मायया मनुजाधिपः ।। २९।५४ ।।**

ज्या अर्थी सायान्ह समयी संजयाला दुर्योधन एकटा जिवंत भेटला होता आणि त्यानंतर दुर्योधनाचा सरोवरप्रवेश झाला, त्या अर्थी त्याच दिवशी अपराण्ह प्रहरी (जो सायान्हाच्या पूर्वी येतो) भीम-दुर्योधन गदायुद्ध होणे कसे संभवनीय आहे ?

दुर्योधन सरोवरात लपून बसल्यानंतर तेथे कृपाचार्य, कृतवर्मा व अश्वत्थामा आले. संजयाकडून त्यांना दुर्योधनाचे लपण्याचे स्थान कळले. महाप्रतापी दुर्योधनाची ती अवस्था पाहून ते तिघे शोक करू लागले. तितक्यात दुर्योधनाचा सर्वत्र शोध करत करत पांडवही त्याच दिशेने येत असलेले पाहून, संजयासह ते तिघे चुपचाप आपल्या रथात बसून कौरवशिबिराकडे निघून गेले. तेथे सर्व पहारेकरी कौरव-विनाश ऐकून आक्रोश करीत होते. यावेळी सूर्यास्त होऊन चुकला होता.



**ते तु मां रथमारोप्य कृपस्य सुपरिष्कृतम् ।।२९।६३।।**
**सेनानिवेशमाजग्मुर्हतशेषास्त्रयो रथाः ।**
**तत्र गुल्माः परित्रस्ताः सूर्ये चास्तमिते सति ।।६४।।**
**सर्वे विचक्रुशुः श्रुत्वा पुत्राणां तव संक्षयम् ।।६५।।**

इकडे सरोवराच्या आसपास कोणीही नाही असे पाहून थकलेले पांडव देखील आपल्या शिबिराकडे विश्रांतीसाठी चालले गेले. अशा प्रकारे सूर्यास्तापावेतो तर ते दुर्योधनाला भेटलेही नव्हते. या दरम्यान विलाप करीत असलेल्या कौरव स्त्रियांना शिबिरांतून घेऊन युयुत्सु हस्तिनापुराला गेला. त्यांच्या तेथे पोचण्याच्या वेळी महाकवीने पुनः सूर्यास्ताचा उल्लेख केला आहे.

**तैश्चैव सहिताः क्षिप्रमस्तं गच्छति भास्करे ।।८७।।**
**प्रविष्टो हास्तिनपुरं बाष्पकण्ठोऽश्रुलोचनः ।।८८।।**

त्या दिवशीच्या दुःखद घटनांचा जो एकंदर वृत्तांत त्याच रात्री युयुत्सूने हस्तिनापुरात कथन केला, त्यात अर्थातच गदायुद्धाचा (जे त्या वेळपावेतो झालेच नव्हते) काहीही उल्लेख नव्हता. सरोवरापासून जेव्हा पांडव चालले गेले तेव्हा अश्वत्थामादि तिघे पुनः हळूहळू तेथे परत आले. त्यांनी दुर्योधनाला हाक मारून त्याच्याशी वार्तालाप सुरू केला. यापूर्वी सूर्यास्त होऊन चुकला होता. त्यांचे हे संभाषण चालू होते तेवढ्यात योगायोगाने दिवसभराच्या श्रमांनी थकलेले कांही शिकारी व्याध तेथे पाणी पिण्यासाठी आले. पूर्वरात्रीच्या अंधारात त्यांचे येणे अश्वत्थामादिकांच्या ध्यानात आले नाही. परंतु व्याधांनी मात्र त्या संभाषणावरून दुर्योधनाचे सरोवरात लपून बसणे ओळखले. आणि धनलोभाने त्यांनी सरळ पांडवशिबिरात जाऊन ती बातमी दिली. ती मिळताच पांडव पुनः सरोवराजवळ आले. त्यांना येतांना पाहून अश्वत्थामा, कृतवर्मा व कृपाचार्य तेथून निघून गेले आणि दुर्योधन पुनः चुपचाप सरोवराच्या पाण्यात लपून बसला. परंतु यावेळी पांडवांनी त्याला आव्हान देऊन बाहेर बोलाविले. त्या संभाषणाचा उल्लेख वर आलाच आहे.

याप्रमाणे शल्यपर्वाच्या नंतरच्या अध्यायात आलेल्या संजयाच्या या साऱ्या वृत्तांतावरून स्पष्ट होते की, शल्यवधाच्या दिवशी अपराण्हकाळी भीम-दुर्योधन गदायुद्ध होण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. पण मग त्याच शल्यपर्वाच्या पहिल्या अध्यायात गदायुद्धाला उद्देशून वैशंपायनाने 'अथापराह्णे तस्याह्नः' कसे म्हटले आहे ? या दोन परस्परविरोधी दिसणाऱ्या वचनांपैकी कोणते तरी एक प्रक्षिप्त आहे काय ? नाही ! त्यांतील शाब्दिक रहस्य इतकेच आहे की, महर्षि व्यासांनी येथे 'अपराह्णे' शब्दाचा प्रयोग दिवसाचा 'अपराह्ण' प्रहर या अर्थाने केला नसून 'अपर+अहन्' अर्थात् दुसरा दिवस या अर्थाने केला आहे![17] म्हणून 'तस्याह्नः अपराण्हे' याचा वास्तविक आशय 'त्या (म्हणजे शल्यवधाच्या) दिवसाच्या दुसऱ्या दिवशी' असा आहे; आणि अशा प्रकारे शल्यपर्वाच्या सुरवातीचा अध्याय आणि त्याचे नंतरचे अध्याय यांत दिसून येणारी विसंगति पूर्णपणे दूर होते. आधी मध्यान्हाचा मुद्दाम उल्लेख करून त्यानंतर लागलीच 'अपराह्ण' शब्दाचा प्रयोग खुबीने केला असल्याने, त्या ('अपराह्ण') शब्दाच्या दुसऱ्या आडवळणातल्या अर्थाची वाचकाच्या मनात सहसा कल्पनाही येत नाही !

या संबंधात दुसरी एक शाब्दिक कूटोक्ति महाभारताच्या प्रारंभीही आढळून येते. समग्र महायुद्धाचा सारांश केवळ तीन श्लोकांत देऊन महाकवि म्हणतात–

अहानि युयुधे भीष्मो दशैव परमास्त्रवित् ।
अहानि पञ्च द्रोणस्तु ररक्ष कुरुवाहिनीम् ।।
अहनी युयुधे द्वे तु कर्णः परबलार्दनः ।
शल्योऽर्धदिवसं चैव गदायुद्धमतः परम् ।।
तस्यैव दिवसस्यान्ते द्रौणिहार्दिक्यगौतमाः ।
प्रसुप्तं निशि विश्वस्तं जघ्नुर्योधिष्ठिरं बलम् ।।
(आदिपर्व २।३०–३२)

१७. महाकवीने 'अपराह्ण' शब्दाचा असा चमत्कारिक उपयोग खालील स्थळीही केला आहे. "अपराह्णेऽपराह्णोऽस्य सूतपुत्रस्य मारिष । छिन्नमञ्जलिकेनाजौ सोत्सेधमपतच्छिरः'' (कर्णपर्व, ९१।६४)



"महास्त्रज्ञाता भीष्माने दहा दिवस युद्ध केले; द्रोणाने पांच दिवस कौरव सेनेचे आधिपत्य केले. शत्रुदमन कर्णाने दोन दिवस युद्ध केले; आणि शल्याने अर्धा दिवस. त्यानंतर गदायुद्ध झाले. त्याच दिवसाच्या शेवटी अश्वत्थामा, कृपाचार्य आणि कृतवर्मा यांनी विजयाने आश्वस्त होऊन गाढ निजलेल्या (शेष) पांडवसैन्याची कत्तल केली."

या श्लोकांच्या थोडचा बारकाईच्या अध्ययनाने स्पष्ट होईल की, महाभारतकार येथे शल्याच्या अर्धदिवस लढाईनंतर गदायुद्ध झाले इतकेच म्हणत आहेत; त्या दोन्ही घटना शब्दशः एकाच दिवशी झाल्या असे त्यांनी म्हटले नाही. हे खरे की, लागलीच पुढे ते म्हणतात की गदायुद्धाच्याच दिवशी रात्री अश्वत्थाम्याने कत्तल केली; आणि ते बरोबरही आहे. पण महाकवीने त्या तीन्ही घटना लागोपाठ इतक्या खुबीने एकामागून एक उल्लेखिल्या आहेत की, त्या सर्वच शब्दशः एकाच रोजी झाल्याचा भ्रम साहजिकच निर्माण होऊन जातो. आणि पुनः त्याच्यावरही कडी म्हणजे, प्रत्यक्ष लढाईचा काळ मोजताना महाकवीच्या सेनापति शल्याची लढाई आणि भीम-दुर्योधन गदायुद्ध या उभय घटनांना एकत्र जोडून अंतिम अठरावा दिवस मोजण्याच्या युक्तीमुळे वरील भ्रम शतकानुशतके तसाच चालू राहिला !

## एक ओळ, जी प्रक्षिप्त नाही !

या भ्रमाने विद्वानांच्या मनावरही किती पगडा बसविला आहे याचे एक उदाहरण पाहा. शल्यवधाच्या दुसऱ्या दिवशी गदायुद्ध झाले याचे स्पष्ट प्रमाण महाकवीने शल्यपर्वातील एका ओळीत ठेवले आहे. परंतु वरील भ्रमामुळे त्या ओळीलाच प्रक्षिप्त मानले जाते ! शल्यपर्वात बलरामाच्या यात्रेचे विस्तृत वर्णन असून त्यात बलराम ज्या ज्या तीर्थस्थानी गेले त्यांची पूर्ण नावे क्रमवार दिली आहेत. प्रभास, चमसोद्भेद, उदपान, विनशन आदिपासून प्रारंभ करून सुमारे छत्तीस तीर्थांचा तेथे उल्लेख आहे. या तीर्थयात्रेच्या शेवटच्या दिवसात बलराम वृद्धकन्या-

क्षेत्र नामक स्थानी येऊन पोचले असताना तेथे त्यांनी शल्यवधाची बातमी ऐकली.

तत्रस्थश्चापि शुश्राव हतं शल्यं हलायुधः ।। ५२।२६ ।।
तत्रापि दत्त्वा दानानि द्विजातिभ्यः परंतपः ।
शुश्राव शल्यं संग्रामे निहतं पाण्डवैस्तदा ।। २७ ।।
समन्तपञ्चकद्वारात् ततो निष्क्रम्य माधवः ।
पप्रच्छर्षिगणान् रामः कुरुक्षेत्रस्य यत्फलम् ।। २८ ।।

उघडच, ही गोष्ट शल्यवधदिवसाच्या अपराण्ह किंवा सायान्ह समयीची असली पाहिजे. येथे समन्तपञ्चक आणि कुरुक्षेत्राच्या विशेष उल्लेखावरून या वेळी बलराम युद्धक्षेत्राच्या जवळच आले होते असे दिसून येते. तेथून ते तडक विष्णुआश्रम, प्लक्षप्रस्रवण व तसेच पुढे कारपवन तीर्थाकडे गेले. कारपवनावर त्यांनी एक रात्र घालविली——

सम्प्राप्तः कारपवनं प्रवरं तीर्थमुत्तमम् ।
हलायुधस्तत्र चापि दत्त्वा दानं महाबलः ।। ५४।१२ ।।
आप्लुतः सलिले पुण्ये सुशीते विमले शुचौ ।।
संतर्पयामास पितॄन् देवांश्च रणदुर्मदः ।। १३ ।।
तत्रोष्यैकां तु रजनीं यतिभिर्ब्राह्मणैः सह ।
मित्रावरुणयोः पुण्यं जगामाश्रममच्युतः ।।१४।।

हा रात्रीचा उल्लेख अत्यंत महत्त्वाचा आहे याच रात्रीनंतर बलराम कारपवनातून मित्रावरुण स्थानी गेले; आणि तेथे यमुनेत स्नान करून ते ऋषींबरोबर धार्मिक कथासंवाद करीत असता नारद मुनींनी तेथे येऊन, त्या वेळी सुरू होण्याच्या बेतात असलेले भीम-दुर्योधन-गदायुद्ध पाहण्यास चलण्याची सूचना केली. त्याप्रमाणे बलरामांनी तत्काळ आपली तीर्थयात्रा समाप्त करून ते गदायुद्धस्थळावर पोचले; व त्यानंतर त्या सकाळच्या वेळी त्यांच्या उपस्थितीत ते गदायुद्ध सुरू झाले. अशा प्रकारे शल्यवध आणि गदायुद्ध यांच्या दरम्यान एक रात्र गेली होती.



याचाच अर्थ असा की गदायुद्ध शल्यवधाच्या दुसऱ्या दिवशी झाले; त्याच दिवशी नव्हे.

पण असे असतांही त्या दोन्ही घटना शब्दशः एकाच दिवशी झाल्या या भ्रामक धारणेने ग्रस्त होऊन, आणि शल्यवधाची बातमी ऐकल्यावर बलरामांनी आपल्या तीर्थयात्रेत कारपवनात एक रात्र घालविलेल्या उल्लेखाची त्या धारणेशी संपूर्ण विसंगति पाहून, महाभारताच्या काही पोथ्यांतून त्या उल्लेखाची वरील ओळ (श्लोक १४ चा पूर्वार्ध) काढून टाकली जाऊ लागली ! आणि शेवटी पुण्याच्या भांडारकर संशोधन संस्थेने प्रकाशित केलेल्या महाभारताच्या आवृत्तीतही ही ओळ प्रक्षिप्त मानली गेली आहे. परंतु आपले वरील सर्व विवेचन सिद्ध करण्यास पुरेसे आहे की, कालगणनेच्या दृष्टीने ही अत्यंत महत्त्वाची पंक्ति मूळ महाभारताचीच असली पाहिजे. तसे नसते तर, बलरामाने कारपवन तीर्थात एक रात्र घालविण्याचा उल्लेख करणारी ही ओळ मागाहून कोणी व्यर्थ आपल्याच मनाने महाभारतात घालण्याचे काही कारण नव्हते. हे येथे सांगणे इष्ट आहे की, तीर्थयात्रेच्या त्या वर्णनात चमसोद्भेद, सप्तसारस्वत, तैजस आदि अन्यही काही स्थांनी बलरामांनी एक एक रात्र घालविल्याचे उल्लेख आहेत.

शल्यवधाच्या दुसऱ्या दिवशी गदायुद्ध झाले हे रहस्य महाभारताच्या अभ्यासकांच्या ध्यानात आले असते तर, अवकाशदिवसांची बाब बाजूस ठेवूनही, पूरा युद्धकाल ते अठरा दिवसांच्या ऐवजी निदान एकोणीस दिवसांचा मोजू शकले असते !

## गीताजयंतीची वास्तविक तिथी

या अशा कालगणनेने अनेक कूटे आता कशी सुटतात पाहा. महाभारतात अनेक ठिकाणी युद्धकाल अठरा दिवसांचा दर्शविला आहे हे खरे. पण त्याचे रहस्य हे आहे की, ते प्रत्यक्ष लढाईचे दिवस आहेत. युद्धकालाच्या एकंदर तिथ्यांची गणना करण्यासाठी त्या दिवसांच्या मध्ये एक एक अवकाशदिवस जोडणे आवश्यक आहे. अठरा दिवसांत हे

अवकाशदिवस सतरा होतील. पण वर स्पष्ट केल्याप्रमाणे त्यांत एक अपवादही असल्याने सोळाच अवकाश दिवस मिळून एकूण दिवस चौतीस होतील. परंतु प्रत्यक्ष लढाईच्या शेवटच्या दिवसाची विभागणी दोन भिन्न दिनांत करण्याच्या खुबीमुळे पूरा युद्धकाल पुन: अंतिम रूपाने पसतीस दिवसांचा होतो.

या गणनेने आता बलराम यात्राकालाच्या कूटाचाही नि:शेष उलगडा होतो. त्या यात्रेची सुरवात युद्धारंभाच्या सात दिवस अगोदर झाली होती. त्या सात दिवसांत आता आपण जर युद्धकाळाचे पसतीस दिवस जोडले तर यात्रासमाप्ती गदायुद्धाच्या वेळी बरोबर बेचाळिसाव्या दिवशी येऊन स्वत: बलरामाचे शल्यपर्वातील वचन तंतोतंत सिद्ध होते. तसेच नक्षत्रांचा हिशेबही बरोबर बसतो. पुष्यापासून श्रवण पंधरा स्थाने पुढे आहे. म्हणून सत्तावीस नक्षत्रांची एक फेरी पूर्ण करून दुसऱ्या चक्करात श्रवण नक्षत्र पुष्यापासून बरोबर बेचाळिसाव्या स्थानावर येते.

अशा रीतीने युद्धारंभाची म्हणजेच गीताजयंतीची वास्तविक तिथि स्वत: श्रीकृष्णवचनानुसार वरील अमावास्याच ठरते. त्या अमावास्येपासून (अवकाशदिन जोडून) एकोणिसाव्या दिवशी भीष्मपतन झाले. त्या दिवशी पुढील कृष्णपक्षाची तृतीया होती. त्यानंतर त्याच पक्षात प्रत्यक्ष लढाईच्या चौदाव्या दिवशी, म्हणजे कृष्ण द्वादशीला, सायंकाळी जयद्रथवध झाला. त्या रोजी उत्तररात्री पुढील सूर्योदयाच्या सुमारे तीन मुहूर्तपूर्वी चन्द्रोदय बरोबर सिद्ध होऊन ते कूटही सुटते. त्या चन्द्रोदयाचे पुढील सुंदर वर्णन नि:संशय महाभारताच्या मूळ कर्त्याचेच असून, नंतर कोणी अनधिकृत रीतीने त्यांत घातलेले मानण्याचे काहीही कारण नाही.

ततः कुमुदनाथेन कामिनीगण्डपाण्डुना ।
नेत्रानन्देन चन्द्रेण माहेन्द्री दिगलङ्कृता ।।४६।।

हरवृषोत्तमगात्रसमद्युतिः स्मरशरासनपूर्णसमप्रभः ।
नववधूस्मितचारुमनोहरः प्रविसृतः कुमुदाकरबान्धवः ।।४८।।

ततो मुहूर्ताद् भगवान् पुरस्ताच्छशलक्षणः ।
अरुणं दर्शयामास ग्रसन् ज्योतिःप्रभाः प्रभुः ।।४९।।



अरुणस्य तु तस्यानु जातरूपसमप्रभम् ।
रश्मिजालं महच्चन्द्रो मन्दं मन्दमवासृजत् ।।५०।।

उत्सारयन्तः प्रभया तमस्ते चन्द्ररश्मयः ।
पर्यगच्छञ्शनैः सर्वां दिशं खं च क्षितिं तथा ।।५१।।

ततो मुहूर्ताद् भुवनं ज्योतिर्भूतमिवाभवत् ।
अप्रख्यमप्रकाशं च जगामाशु तमस्तथा ।।५२।।

यथा चन्द्रोदयोद्भूतः क्षुभितः सागरोऽभवत् ।
तथा चन्द्रोदयोद्भूतः स बभूव बलार्णवः ।।५५।।

ततः प्रववृते युद्धं पुनरेव विशाम्पते ।
लोके लोकविनाशाय परं लोकमभीप्सताम् ।।५६।।

(द्रोणपर्व, १८४)

हे स्पष्टपणे पूर्व दिशेला क्षितिजावर होणाऱ्या प्रत्यक्ष चन्द्रोदयाचे मार्मिक वर्णन असून, ते महाभारतयुद्धाच्या गूढ कालगणनेशी पूर्णपणे सुसंगत आहे. त्या चन्द्रोदयाच्या आपत्तीपासून कशी तरी सोडवणूक करून घेण्यासाठी काही भाष्यकारांनी सुचविल्याप्रमाणे ते केवळ मेघावरणातून बाहेर पडणाऱ्या चन्द्रबिंबाचे वर्णन नव्हे.

युद्धकाळातील अवकाश दिवसाची ही गूढ कल्पना महर्षि व्यासांनी आपल्या मनात गुप्त ठेवून त्या आधारे महाभारत काव्यात दिवसांची गणना केली; परंतु अत्यंत संदिग्ध शब्दरचनेच्या जाळ्यात ते रहस्य लपवून ठेवले. यामुळेच महाभारतातील युद्ध वर्णनात जागोजागी अगम्य कूटे व विसंगतीचे आभास निर्माण होऊन त्यांना सोडविण्याचे अनेकानेक प्रयास होत राहिले. त्यांची काही उदाहरणे वर दिली आहेत. त्याशिवाय माझ्या नागपूरच्या व्याख्यानाच्या वेळी आणखीही एका लेखाकडे माझे लक्ष वेधले गेले.[१८] त्याचे लेखक, श्री रा. ल. गोखले, प्राचीन काळच्या युद्धात अवकाशदिनांची प्रथा होती (ज्याचा आधार त्यांनी दिलेला नाही) असे म्हणून ते पुढे म्हणतात की, परंतु महाभारत काव्याच्या

१८. विविधज्ञानविस्तार, १९२१ (महाराष्ट्र साहित्य पत्रिका, वर्ष ९, पृ. ७५).

कर्त्याला किंवा कांही कर्त्यांना मात्र ते माहीत नसल्याने त्यात दिलेले युद्धवर्णन बव्हंशी लागोपाठ दररोज लढाईच्या कल्पनेवरच आधारित आहे. आणि याचमुळे (अमावास्येला युद्धारंभ मानून) त्या लागोपाठ दररोज युद्धाच्या कल्पनेशी विसंगत दिसणारे वरील उत्तररात्रीच्या चन्द्रोदयाचे वर्णन श्री. गोखल्यांच्या मतानेही मूळ महाभारतात कोणीतरी मागाहून कसेबसे घुसडलेले आहे. अशा प्रकारे युद्धकाळातील अवकाश-दिनांच्या कोणत्या तरी तथाकथित प्राचीन प्रथेचा उल्लेख करूनही ते देखील महाभारताच्या गूढ श्लोकांचा प्रायः परंपरागत दृष्टीनेच विचार करितात; आणि त्यात वरवर दिसणाऱ्या परस्परविसंगतींना वास्तविक मानतात.

आता येथे विचार करण्याची गोष्ट अशी की, प्राचीन काळी भारतीय युद्धनीतीत जर खरोखरच अशी एखादी सर्वसाधारण प्रथा असती, तर तत्कालीन उपलब्ध सर्व ज्ञानविज्ञानाच्या विश्वकोश स्वरूपात ज्या अलौकिक महाभारत ग्रंथाची शतकानुशतके यथार्थ प्रशंसा होत आली आहे, त्याच्याच महान रचयित्याला ती प्रथा माहीत नसती काय ? आणि तसे असते तर महाकवीने आपल्या कालगणनेत त्या गोष्टीचा इतका गुप्त उपयोग का केला असता? आणि त्यांनी केला तरी त्याचे इतकी शतके भारतीय विद्वानांना एक अगम्य कूट होऊन कसे राहिले असते ? हे शक्य आहे की, महाभारतकारांनी युद्धकालातील अशा विश्रांतीची एखादी प्रत्यक्ष घटना कदाचित् पाहिली किंवा ऐकली असेल.[१९] परंतु ज्या योजनाबद्ध, कल्पनारम्य व गूढ स्वरूपात अशा युद्धविरामाचा उपयोग महाभारत काव्याच्या रचनेत केला गेला आहे (आणि तो हुडकून काढण्यासाठी महाकवीने आपल्या वाचकांना जे आव्हान दिले आहे) ते पाहता हेच म्हणणे उचित होईल की, पूरे अठरा दिवस लढल्या जाणाऱ्या कौरवपांडवयुद्धात उभयसंमतीने अवकाशदिवस ठेवले जाण्याची ही विलक्षण कल्पना मुख्यतः महाभारतकारांच्याच

१९. हल्लीच्या काळीही व्हिएत्नाम युद्धात एखाद्या विशेष धार्मिक प्रसंगी उभयसंमतीने कधी कधी लढाई स्थगित केली जाते.



प्रतिभेची अद्‌भुत निर्मिति असली पाहिजे. आणि म्हणूनच त्याचा इतका रहस्यमय अत्यंत बुद्धिपूर्ण उपयोग त्यांनी आपल्या काव्यरचनेत प्रारंभा-पासूनच केला असून, ही गोष्ट आता महाभारताच्याच श्लोकांच्या सूक्ष्म अध्ययनाने स्पष्ट होत आहे. याशिवाय आणखीही महत्वाची बाब ही की, महाभारतातील कालगणनात्मक कूटस्थळांत या व अन्यही संबंधित रहस्यांच्या या अशा सुसंगत गूढ उपयोगावरून आता असेही दिसून येत आहे की, हे प्रचंड महाकाव्य मुख्यतः एकाच अतिप्रतिभासंपन्न महापुरुषाची एकटाकी कृती असली पाहिजे–मग तो व्यक्ती खरोखर कोणीही असो !

कौरवपांडवलढाई वस्तुतः एक प्रत्यक्ष ऐतिहासिक घटना होती किंवा काय, आणि असल्यास तिचा कालानुक्रम महाभारत काव्यात मूळ घटनेनुसारच दाखविला आहे किंवा कविकल्पनेने परिवर्तित केला गेला आहे, या प्रश्नांची निश्चित उत्तरे तेव्हा देता येतील जेव्हा या कथेसाठी या महाकाव्याव्यतिरिक्त अन्यही पुरेसा विश्वसनीय पुरावा उपलब्ध होईल. मात्र, लढाईमध्ये अशा विश्रांतीचा आणखी एखादा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष उल्लेख भारतीय अगर अन्य कोणत्याही प्राचीन साहित्यात आढळतो की काय याचा शोध घेणे अवश्य इष्ट होईल; त्यावरून महा-भारत व महाभारतकार यांच्या स्थलकालावर अधिक प्रकाश पडू शकेल.

## युद्धारंभदिवसाचे नक्षत्र

युद्धारंभाच्या (म्हणजेच गीतोपदेशाच्या) दिवशी चन्द्र कोणत्या नक्षत्रांत होता, याचीही विद्वानांकडून खूप चर्चा झाली आहे. स्वतः महाभारतकारांनी यासंबंधात एक महत्त्वपूर्ण संकेत ठेवलेला आहे. श्रीकृष्णाच्या युद्धारंभतिथीच्या घोषणेत त्या अमावास्येला 'शक्रदेवताम्' म्हटले आहे. अर्थात् त्या अमावास्येच्या नक्षत्राची देवता इन्द्र होती. प्राचीन भारतीय साहित्यात प्रत्येक नक्षत्राची देवता दिलेली आहे.

डॉ. काणे, डॉ. दप्तरी आणि श्री. गोखले, अमावास्येलाच युद्धारंभ मानून तिचे नक्षत्र ज्येष्ठा दाखवितात. मद्रासचे प्रो. के. श्रीनिवास राघवन[२०] त्या अमावास्येला प्रत्यक्ष युद्धारंभाऐवजी केवळ युद्धतयारीचा

२०. पूर्वोल्लिखित.

आरंभ मानतात; पण त्या अमावास्येचे नक्षत्र मात्र ज्येष्ठाच मानतात. हे सर्व लेखक ज्येष्ठा नक्षत्रासाठी उद्योगपर्वाचा आधार घेत असतात. परंतु यासंबंधात ज्येष्ठेचा उल्लेख उद्योगपर्वात तर नाहीच; पण महाभारतात अन्यत्रही कोठे आढळत नाही. जे काय आहे ते इतकेच की, उद्योगपर्वातील वर उद्धृत केलेल्या श्रीकृष्णघोषणेच्या श्लोकात त्या अमावास्येला ' शक्रदेवताम् ' म्हटले आहे; आणि ज्येष्ठा असे एक नक्षत्र आहे की ज्याची देवता इन्द्र आहे. म्हणून या लेखकांचे अनुमान आहे की, त्या अमावास्येला ज्येष्ठा नक्षत्र असले पाहिजे.

पण असे पाहा की, हस्तिनापुरात ज्या दिवशी श्रीकृष्णांनी युद्धारंभतिथीची ती घोषणा केली, त्या दिवसापासून ती अमावास्या सात दिवस पुढे होती हे तर निर्विवादच आहे. आणि घोषणादिवशी पुष्य नक्षत्र होते हेही महाभारतात स्पष्टच सांगितले आहे. पुष्यापासून ज्येष्ठा दहा स्थाने पुढे आहे. असे असता केवळ सात दिवसात चन्द्र दहा नक्षत्रे ओलांडू शकेल काय? जर आपण सात दिवसात तीन नक्षत्रलोपांची असंभवनीय कल्पना मानली तरच हे शक्य होईल. परंतु महाभारताची विशाल कथा महर्षि व्यासांची केवळ कविकल्पना असो वा नसो, इतके निश्चित म्हणता येईल की त्यात त्यांनी (एका काल्पनिक कथेला इतिहासाचा वेश देण्याच्या हेतूने का होईना) जे ज्योतिष व कालगणना यांचे सूक्ष्म उल्लेख केले आहेत ते या लेखकांना वाटतात तसे पूर्ण असंभवनीय व अशास्त्रीय नाहीत. तरीही स्थूल दृष्टीने पाहता महाभारताच्या वचनात दिसणाऱ्या विसंगतीचे रहस्य ध्यानांत न आल्याने अनेक अभ्यासक महाभारतालाच दोष देत असतात.[२१]

२१. पाहा. "The above detailed statement about the astronomical passages of the *Mahābhārata* will induce any unbiassed reader who has no axe to grind that they are hopelessly inconsistent and that no certain chronological conclusion can be drawn therefrom.. To me it appears probable that the final redactor of the *Mahābhārata* had two or more sets of astronomical data about the war

[ पुढील पानावर



आता काही इतर लेखकांचीही मते पाहा. महाभारतावर नीलकंठाचार्यांचे भाष्य महत्त्वाचे मानले जाते. श्रीकृष्णवचनाची काहीही पर्वा न करिता ते युद्धारंभतिथि मार्गशीर्ष शुक्ल त्रयोदशी (किंवा चतुर्दशी) आणि नक्षत्र मृग मानतात.[२२] त्याचे कारण इतकेच की

मागील पानावरून ]

before him and without trying to examine and sift them he included them all in his work....As I hold that either the *Mahābhārata* passages on the positions of the planets were interpolated at a very late stage or are hopelessly inconsistent, I deem it unnecessary to enter upon an examination of the Mathematical calculations made by several scholars to find out the date of the Bhārata war from the shifting of the solstices and the position of the planets."–Dr. P. V. Kane, *Htstory of Dharmaśāstra*, Vol III, p. 923. See also, "Some of the *Mahābhārata* references to astronomy afford an even better illustration of reckless astrological statements made without due regard to astronomical possibilities."–Swamikannu Pillai (quoted in Prof. Raghavan's *The Date of the Mahābhārata War*, p. 36).

२२. किंबहुना आणखी आश्चर्याची गोष्ट म्हणजे भीष्मपर्वावरील आपल्या भाष्यात एका ठिकाणी नीळकंठ युद्धारंभघोषणेच्या श्रीकृष्णवचनाला दुर्योधनाचेच उद्गार दर्शवून, त्यांत 'संग्राम' शब्दाचा अर्थ 'संग्रामाची तयारी' असा करतात ! "यत्तु 'सप्तमाच्चापि दिवसादमावास्या भविष्यति संग्रामं योजयेत्तत्र तां ह्याहुः शक्रदेवताम् । प्रयाध्वं वै कुरुक्षेत्रं पुष्योद्येति पुनः पुनः' इति दुर्योधनवाक्यम् । तत्र संग्राममित्यनेन संग्रामे जयसाधनं धाराबंधादिकं तस्यां योजयेदित्युक्तम्" । आता 'प्रयाध्वं वै कुरुक्षेत्रं पुष्योद्य' हे शब्द मूलतः दुर्योधनाचे असून ते श्रीकृष्णांनी पांडवांना कथन केले हे खरे, परंतु 'सप्तमाच्चापि.... शक्रदेवताम्' हे वचन निःसंशय स्वतः श्रीकृष्णाच्या कर्णाशी झालेल्या संभाषणाचा एक भाग असून तो त्यांनीच दुर्योधनाला पाठविलेला संदेश आहे. हे वचन उद्योगपर्वातले असून तेथे स्वतः नीळकंठाचार्यांनीही ते दुर्योधनाचे मानलेले नाही !

नीलकंठ गदायुद्धदिवसाला युद्धाचा शेवटचा लागोपाठ अठरावा दिवस मोजतात; आणि त्या दिवशी बलरामवचनानुसार श्रवण नक्षत्र असल्याने, श्रवणापासून अठरा स्थाने मागे जाऊन जे मृग नक्षत्र येते त्यालाच ते युद्धारंभाचे नक्षत्र मानतात. याच मताचे अनुकरण महाराष्ट्रात कै. चिंतामणराव वैद्य आदि करतात. परंतु एक तर, आता सिद्ध होत असल्याप्रमाणे युद्धारंभतिथि त्यांच्या मताप्रमाणे मार्गशीर्ष शुक्ल त्रयोदशी नसून तत्पूर्वीची अमावास्या आहे. आणि याशिवाय अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे, पूर्ण युद्धकाल अठरा दिवसांचा नसून पसतीस दिवसांचा होता. म्हणून गदायुद्ध दिवशीच्या श्रवण नक्षत्रापासून आपल्यास पस्तीस स्थाने मागे मोजल्यावरच युद्धारंभनक्षत्र उपलब्ध होऊ शकेल.

या मतांशिवाय अन्य कांही लेखक युद्धारंभनक्षत्र भरणी,[२३] रोहिणी,[२४] पुनर्वसु–पुष्य[२५] देखील दाखवितात. पण त्यापैकी कोणाचीही देवता इन्द्र नाही; आणि त्या आधारे महाभारतात बलरामयात्रेची स्पष्ट दिलेली नक्षत्रे ही सिद्ध होत नाहीत.

---

२३ ज्योतिर्विद् पंडित देवकीनंदन खेडवाल कृत 'महाभारत-युद्धकालनिर्णय' (हिंदी), पृ. ८, आणि 'भारतीय कालगणना' (हिंदी) पृ १२६. या नक्षत्राचा सर्वप्रथम उल्लेख 'भारतसावित्री'त (वर टीप ११ पाहा) आढळतो; पण प्रत्यक्ष महाभारतात दिलेल्या सूक्ष्म संकेताशी ते स्पष्टपणे विरोधी आहे.

२४ पाहा : Mr. K. V. Abhyankar's article "The Date and Time of the Mahābhārata War" *Annals af the Bhandarkar Oriental Research Institute*, Poona, Vol XXV, pp. 116–136).

२५ पाहा : "भारतीययुद्धकालनिर्णय", लेखक प्रो. र. वि. वैद्य १९६४. यांच्या मताने महाभारतयुद्धकाल केवळ सोळा दिवसांचा होता. यांचे हेही म्हणणे आहे की, भीष्मनिधनसमय शुक्ल पक्षात येऊच शकत नाही !



तर मग वस्तुतः महाकवीचे संकल्पित युद्धारंभ नक्षत्र कोणते होते ? ते चित्रा होते. येथे मौज अशी आहे की ज्येष्ठा व चित्रा ह्या दोहोंचीही देवता इन्द्र दाखविली गेली आहे.[२६] पुष्यापासून चित्रा सहा स्थाने दूर आहे. म्हणून घोषणादिवस आणि युद्धारंभ यामधील सात दिवसात एक नक्षत्रवृद्धी मानून (जी पूर्ण संभवनीय आहे) अमावास्येला चित्रा नक्षत्र येते. आणि याच आधारे पुढे दिलेल्या तिथिगणनेत बलराम-यात्रेच्या समाप्तीला बरोबर श्रवण नक्षत्र देखील येते. याशिवाय युद्धारंभ-समयी बुध, गुरू आदि अन्य ग्रहांच्या स्थितीचे महाभारतकारांनी जे काहीसे कूटमय वर्णन दिले आहे त्याचीही संगती चन्द्राला चित्रेत मानून बरोबर लागते.[२७] मात्र त्याचा पूर्ण खुलासा मी या लेखात देऊ शकत नाही याचा मला खेद आहे.

## भीष्मनिधनाची वास्तविक तिथि

शेवटी भीष्मनिधनतिथीच्या महान कूटाचाही सरळ उलगडा पाहा. अमावास्येला युद्धारंभ मानून पुढील कृष्ण तृतीयेला (जो प्रत्यक्ष लढाईचा दहावा दिवस होता) सायंकाळी भीष्मांचे पतन झाले; आणि तेव्हापासूनच त्यांच्या भयानक शरशय्येला आरंभ झाला. आता त्या कृष्ण तृतीयेपासून आपण बरोबर ५८ रात्री मोजू या—

१३ रात्री, त्या कृष्ण पक्षाच्या शेष.
१५ रात्री, पुढील शुक्ल पक्षाच्या (पौष मास).
१५ रात्री, त्यानंतर येणाऱ्या कृष्ण पक्षाच्या.
१५ रात्री, पुढील शुक्ल पक्षाच्या (माघ मास).
——
५८

(वस्तुतः पहिल्या कृष्ण पक्षात एक तिथिलोप असल्याने त्याच्या शेष रात्री कमी होऊन बाराच होत्या; आणि त्याच्या बदल्यात नंतरच्या

---

२६. तैत्तिरीय संहिता, ४–४–१०, तैत्तिरीय ब्राह्मण, १–५–१.
२७. केवळ शुक्राची स्थिति अजून पूर्ण स्पष्ट व्हावयाची आहे.

शुक्ल पक्षात एक तिथिवृद्धि येऊन त्याची रात्रिसंख्या वाढून सोळा होती––पुढे तिथितालिकेत दिलेले स्पष्टीकरण पाहा. परंतु यामुळे एकूण रात्रींच्या अठ्ठावन संख्येत काही फरक पडत नाही हे उघड आहे ). आता ह्या गणनेप्रमाणे आपण बरोबर माघ शुक्ल पौर्णिमेच्या रात्रीच्या समाप्ति-कालावर येऊन पोहोचतो. आणि पुढील कृष्ण प्रतिपदेच्या पूर्वी येणारा हाच पवित्र उषःकालसमय होता, तेव्हा महात्मा भीष्माचार्यांची प्राण-ज्योति अनंत ईश्वरतत्त्वात कायमची विलीन झाली. त्या वेळी महिना माघ होता, आणि पक्ष, महाभारतात म्हटल्याप्रमाणे, बरोबर शुक्ल होता. आता प्रश्न राहिला महाकवीने उपयोजिलेल्या 'त्रिभागशेष' शब्दाचा. त्याचा वास्तविक आशय इतकाच की, त्यावेळी त्या शुक्ल पक्षाचे ( अर्थात् त्याची जी अंतिम तिथि पौर्णिमा तिच्या रात्रिकालाचे ) केवळ तीन 'मुहूर्त' शिल्लक होते. येथे 'भाग' शब्दाचा अर्थ 'मुहूर्त' असा आहे. एका दिवसात तीस मुहूर्त असून, एक मुहूर्त अठ्ठेचाळिस मिनिटांचा होतो. येथे 'त्रिभाग' शब्दाचा आशय त्या शुक्ल पक्षाचा गणिताच्या हिशेबाने तीन चतुर्थांश भाग ( म्हणजे सुमारे अकरा दिवसाचा काळ ), किंवा एक तृतीयांश भाग ( म्हणजे सुमारे पाच दिवसांचा काळ ), अगर त्या माघ महिन्याचाही तीन चतुर्थांश भाग ( म्हणजे सुमारे तीन आठवड्यांचा काळ ) असाही नव्हे. कूटसम्राट महाकवीच्या या एका श्लेषात्मक 'त्रिभागशेष' शब्दानेही ( 'अपराह्णे' प्रमाणे ) शतकानुशतके पसरलेला भ्रम पाहिला म्हणजे मन आश्चर्याने थक्क होते ![२८]

२८. मौजेची गोष्ट अशी की 'भाग' शब्दाचा मुहूर्ताच्या अर्थाने उपयोग महाकवीने महाभारतात अन्यत्रही केला आहे; पाहा द्रोणपर्व, १८६-१; १९१-९. आता हे सहजच उघड होईल की महाभारताच्या काही प्रतींत आढळून येणारा पुढील श्लोक अनधिकृत ( इन्टरपोलेशन ) मानला पाहिजे. "शुक्लपक्षस्य चाष्टम्यां माघमासस्य पार्थिव। प्राजापत्ये च नक्षत्रे मध्यं प्राप्ते दिवाकरे ॥" ( शांतिपर्व, अध्याय ८७ ). यात भीष्मनिधनतिथि माघ शुद्ध अष्टमी दाखविली आहे. 'त्रिभागशेषः'

( पुढील पानावर )



येथे आणखीही एक सूक्ष्मता आहे; ती पाहून वाचकांना विशेष आनंद होईल, असा मला विश्वास वाटतो. अठ्ठावनावी रात्र म्हणजे पौर्णिमेचीच रात्र असल्याने ती समाप्त होताच शुक्लपक्षही समाप्त होतो; आणि म्हणून जर भीष्मनिधन शुक्ल पक्षातच झाले असेल तर ती अठ्ठावनावी रात्र त्यावेळी पूर्ण समाप्त झाली नव्हती, किंवा ते निधन कृष्णपक्षात झालेले मानले पाहिजे, अशी शंका कोणी उपस्थित करू शकेल. या शंकेच्या स्पष्टीकरणाने महाकवीच्या गणित आणि ज्योतिष-विषयक उद्गारांच्या आश्चर्यजनक सूक्ष्मतेवर अधिक प्रकाश पडेल. प्रस्तुत संदर्भात महाभारतात 'रात्रि' शब्दाचा उपयोग केला आहे. आता संस्कृतात दिवसाच्या सूर्यविहीन काळाला 'रात्रि', 'रजनी', 'निशा', 'शर्वरी' इत्यादी अनेक शब्द आहेत. यांत शुद्ध शास्त्रीय परिभाषेनुसार 'निशा' शब्दात सूर्यास्तापासून सूर्योदयापावेतोचा पूर्ण काळ येतो. परंतु 'रात्रि'मध्ये दोन्हीकडचे संध्यासमय ( म्हणजे सायंसंध्या व उषःकाल ) समाविष्ट होत नाहीत. अशा रीतीने भीष्मनिधनाच्या वेळी अठ्ठावन 'रात्रि' पूर्ण झाल्या होत्या, आणि तरीही शुक्लपक्ष होता हे महाकवीचे वचन बरोबर ठरते. का की, ती घटना कृष्ण पक्षाच्या प्रथम सूर्योदयाच्या पूर्वी उषःकालात घडली होती. येथे हे उल्लेखनीय आहे की, महाभारतात अन्यत्रही 'रात्रि' शब्दाचा याच सूक्ष्म अर्थाने उपयोग केलेला असून, जेथे सूर्यास्तानंतर तत्काळ येणाऱ्या क्षणांचा संबंध आहे तेथे 'निशा' शब्द वापरला आहे. गीतेतही मृत्यू-

( मागील पानावरून )

शब्दाने भ्रमित होऊन कोणी तरी हा श्लोक लिहिला असला पाहिजे. आणि या श्लोकाप्रमाणे 'त्रिभागशेषा'चा संबंध माघ महिन्याशीच ( त्यालाही अमावास्यान्त मानून ) जोडावा लागेल; कारण शुक्लपक्ष कोणत्याही अर्थाने त्या तिथीला 'त्रिभागशेष' म्हणता येणार नाही. महाभारतात दिलेले सर्व संबंधित सूक्ष्म संकेत व कालगणनात्मक उल्लेख या श्लोकाच्या विरुद्ध जातात. हा श्लोक गाळला तरी त्याच्या नंतर येणाऱ्या विषयविवेचनाला कोणतीही बाधा पोचत नाही हे वाचकांना आढळून येईल.

साठी श्रेष्ठ व कनिष्ठ काळाच्या वर्णनात ( अध्याय ८, श्लोक २४,२५ ) ‘ रात्रि ’ शब्दच वापरला आहे हे वाचकांना माहीत आहे. आणि आता ‘ रात्रि ’ शब्दाचा हा सूक्ष्मार्थ ध्यानात घेतल्यावर महाभारतकारांनी भीष्माच्या तोंडी मृत्युसमयी त्या शुक्लपक्षाला उद्देशून ‘ भवति ’ किंवा ‘ अस्ति ’ असे सरळ न म्हणता ‘ भवितुम् अर्हति ’ असे आडवळणातले शब्द का घातले हेही स्पष्ट होईल. पौर्णिमेची ‘ रात्र ’ संपली होती तरीही कृष्णपक्षास प्रत्यक्ष प्रारंभ झाला नसल्याने या वेळी कृष्णपक्षच ‘ मानणे उचित होईल ’ असे ते मार्मिक वचन आहे. याच ‘ भवितुम् अर्हति ’ शब्दांचा चुकीच्या अर्थाने आधार घेऊन अनेक विद्वान भीष्मनिधनतिथि कृष्णपक्षात मानून त्यालाच शुक्लपक्ष मानावे असे म्हणत असतात.

## काही सूक्ष्म संकेत

महाभारतातील युद्धवर्णनात लपविलेल्या अवकाशदिनांना ध्यानात घेतल्याने महाकवीने उल्लेखिलेल्या विभिन्न दिनसंख्यांचा आणि तिथ्यांचा हिशेब अशा रीतीने बरोबर लागतो. परंतु त्याशिवायही यांची अन्य कित्येक सूक्ष्म प्रमाणे महाभारताच्या श्लोकांत उपलब्ध होतात. अनेक अवकाशदिवशी कोणकोणत्या विशिष्ट घटना झाल्या तेही दाखविणे शक्य आहे. महाभारताच्या श्लोकांत या अवकाशदिनांची जी अशी प्रमाणे आहेत, त्यातील एक येथे देत आहे. वाचकांनी यासाठी महाभारतयुद्धविषयक तीन भिन्न तिथिगणना आपल्या दृष्टिसमोर ठेवणे इष्ट होईल. पहिली आमच्या मतानुसार असून, तिच्याप्रमाणे अमावास्येला युद्धप्रारंभ होऊन लढाई शेवटच्या अठराव्या दिवसापावेतो अवकाशदिनांसहित (एक अपवाद सोडून) चालली. दुसऱ्या गणनेप्रमाणे युद्धारंभ अमावास्येलाच झाला, परंतु लढाई दररोज झाली; हे मत डॉ. काणे, डॉ. दप्तरी इत्यादींचे आहे. तिसऱ्या गणनेनुसार युद्धारंभतिथि मार्गशीर्ष शुक्ल एकादशी ( काहींच्या मते त्रयोदशी ) असून लढाई दररोज लागोपाठ चालली; याच मताला अनुसरून भारतात गीताजयंती साजरी करण्याची दीर्घकालीन प्रचलित परम्परा पडली आहे. या तीनही गणनांच्या आधारे प्रत्यक्ष लढाईचे विभिन्न दिवस पुढील तिथ्यांवर येतात.



| लढाईचा दिवस | प्रथम गणना | द्वितीय गणना | तृतीय गणना |
|---|---|---|---|
| १ ( गीता जयंती ) | अमावास्या | अमावास्या | शुक्ल एकादशी |
| २ | शुक्ल द्वितीया. | शुक्ल प्रतिपदा. | ,, द्वादशी |
| ३ | ,, चतुर्थी. | ,, द्वितीया. | ,, त्रयोदशी. |
| ४ | ,, षष्ठी. | ,, तृतीया. | ,, चतुर्दशी. |
| ५ | ,, अष्टमी. | ,, चतुर्थी. | ,, पौर्णिमा. |
| ६ | ,, दशमी. | ,, पंचमी. | कृष्ण प्रतिपदा. |
| ७ | ,, द्वादशी. | ,, षष्ठी. | ,, द्वितीया. |
| ८ | ,, चतुर्दशी. | ,, सप्तमी | ,, तृतीया. |
| ९ | कृष्ण प्रतिपदा. | ,, अष्टमी. | ,, चतुर्थी. |
| १० ( भीष्मपतन ) | ,, तृतीया. | ,, नवमी. | ,, पंचमी. |
| ११ | ,, पंचमी. | ,, दशमी. | ,, षष्ठी. |
| १२ | ,, सप्तमी. | ,, एकादशी. | ,, सप्तमी. |
| १३ | ,, दशमी[29] | ,, द्वादशी. | ,, अष्टमी. |
| १४ ( जयद्रथवध ) | ,, द्वादशी. | ,, त्रयोदशी. | ,, नवमी. |
| १५ ( द्रोण वध ) | ,, त्रयोदशी. | ,, चतुर्दशी. | ,, दशमी. |
| १६ | ,, अमावास्या. | ,, पौर्णिमा. | ,, एकादशी. |
| १७ | शुक्ल द्वितीया. | कृष्ण प्रतिपदा. | ,, द्वादशी. |
| १७½ ( शल्य वध ) | ,, चतुर्थी. | } ,, द्वितीया | } ,, त्रयोदशी |
| १८ ( दुर्योधन वध ) | ,, पंचमी. | | |

आता विशेष गोष्ट अशी की, महाभारताच्या कर्त्याने लढाईच्या प्रत्येक दिवसाचे विस्तृत वर्णन दिले असून, त्यात काही दिवशी सूर्यास्त होताच सर्वत्र अंधार व्यापल्याचे म्हटले आहे. ते उघडच कृष्णपक्ष सूचित करते. याशिवाय त्यात असेही म्हटले आहे की, काही दिवशी सूर्यास्ताबरोबरच लढाई स्थगित झाली; पण काही दिवशी सूर्यास्तानंतरही चालू राहिली. ज्या दिवशी सूर्यास्तानंतर लढाई चालू राहिली, त्यापैकी एक

२९. येथे एक तिथिक्षय असून त्याचे स्पष्टीकरण पुढे दिले आहे.

दिवस ( म्हणजे प्रत्यक्ष लढाईच्या चौदाव्या दिवशी ) अंधकाराचा स्पष्ट उल्लेख असून त्यात मशाली जाळून युद्ध झाले असेही वर्णन आहे. म्हणून जेथे सूर्यास्तानंतरही लढाई चालू राहिल्याचे दाखविले आहे, परंतु अंधाराचा उल्लेख नाही, तेथे चन्द्र प्रकाशाचा संकेत मिळतो. या सर्व संदर्भात आपण तीन्ही तिथिगणनांचे परीक्षण केले, तर केवळ प्रथम गणनाच पूर्ण खरी ठरते. बाकी दोघांचा या संकेतापैकी काहीशी समन्वय झाला तरी शेष संकेतांनी त्यांचे खंडन होते. याचे काहीसे स्पष्टीकरण पुढे देत आहे.

युद्धारंभाच्या दिवशी सूर्यास्त होताच लढाई बंद झाली. त्या वेळचे वर्णन करताना महाभारतकार म्हणतात--

**ततः सैन्येषु भग्नेषु मथितेषु च सर्वशः ।**
**प्राप्ते चास्तं दिनकरे न प्राज्ञायत किञ्चन ।। भीष्मपर्व, ४९-५२ ।।**

येथे म्हटल्याप्रमाणे त्या दिवशी सूर्यास्त होताच सर्वत्र इतका अंधार झाला की, कोणास काहीच दिसेना. हा मार्मिक संकेत अमावास्या सिद्ध करून शुक्ल एकादशी ( किंवा त्रयोदशी ) चे पूर्ण खंडन करीत नाही काय ? यानंतर लढाईच्या दुसऱ्या, तिसऱ्या, चौथ्या आणि पाचव्या दिवशी देखील सूर्यास्तानंतर लढाई बंद झाली खरी; पण तेथे महाभारतकारांनी अंधाराचा उल्लेख केला नाही. अर्थात् चन्द्रोदय तर होता पण त्यात लढाई चालावी इतका प्रकाशही नव्हता. प्रथम ( आणि त्याचप्रमाणे द्वितीय ) गणनांच्या तिथ्या या वस्तुस्थितीशी सुसंगत आहेत; परंतु तृतीय गणनेच्या तिथ्या विसंगत आहेत. सहाव्या दिवशी देखील सूर्यास्तानंतर अंधाराचा उल्लेख नाही, पण लढाई आणखी काही वेळ चालू राहिण्याचा सर्वप्रथम उल्लेख आढळतो--

**अन्योन्यागस्कृतां राजन् यमराज्यविवर्धनम् ।**
**मुहूर्तास्तमिते सूर्ये चक्रुर्युद्धं सुदारुणम् ।। भीष्मपर्व, ७९-६० ।।**

हे वर्णन देखील प्रथम गणनेच्या शुक्ल दशमीचे समर्थन व तृतीय गणनेच्या कृष्ण प्रतिपदेचे खंडन करिते.



सातवा दिवस पहा. त्या दिवशीही सूर्यास्तानंतर लढाई आणखी काही वेळ चालू राहिली, पण त्याच्या वर्णनात अंधाराचा उल्लेख नाही. हे देखील पुनः प्रथम गणनेच्या शुक्ल द्वादशीचे समर्थन करून तिसऱ्या गणनेची कृष्ण द्वितीया चूक ठरविते.

नवव्या दिवशी प्रथम गणनेनुसार कृष्णपक्षाची प्रतिपदा होती. परंतु दुसऱ्या गणनेप्रमाणे त्या दिवशी शुक्ल अष्टमी होती. त्या दिवशीच्या वर्णनात संध्यासमय 'घोर' भासत होता असा दोन वेळा विशेष उल्लेख आहे--

**युद्ध्यतामेव तेषां तु भास्करेऽस्तमुपागते ।**
**संध्या समभवत् घोरा नापश्याम ततो रणम् ।। भीष्मपर्व, १०७-१ ।।**

**तस्मिन् रात्रिमुखे घोरे पांडवा वृष्णिभिः सह ।**
**सृञ्जयाश्च दुराधर्षा मन्त्राय समुपाविशन् ।। १० ।।**

उघडच आहे की कृष्णपक्षाच्या त्या प्रतिपदेला सूर्यास्तानंतरचा समय चन्द्रप्रकाशाच्या अभावी विशेष 'घोर' प्रतीत होत होता. महाभारतात शुक्ल पक्षाच्या संध्याकाळच्या वर्णनात 'घोर' शब्द आढळत नाही. वरील वर्णन त्या दिवशी शुक्ल अष्टमी असल्याचे खंडन करिते. याच प्रकारे लढाईच्या अकराव्या दिवशी सूर्यास्त होताच संपूर्ण अंधकार पसरला होता--

**सूर्ये चास्तमनुप्राप्ते तमसा चाभिसंवृते ।**
**नाज्ञायत तदा शत्रुर्न सुहृन्न च कश्चन ।। द्रोणपर्व, १६-४९ ।।**

प्रथम तिथिगणनेनुसार ती कृष्ण पंचमी असून हे वर्णन तिला बरोबर लागू पडते. ती द्वितीय गणनेची शुक्ल दशमी होऊ शकत नाही.

शेवटी लढाईचा चौदावा दिवस पाहा. याच्या रात्रीची वर बरीच चर्चा आली आहे. महाभारतात अनेक वेळा म्हटले आहे की, या दिवशी सूर्यास्त होताच अंधकार भरून गेला. मात्र त्या अंधारातही मशाली जाळून भयंकर रात्रियुद्ध चालू राहिले. अर्जुनाची जयद्रथवधप्रतिज्ञा पूर्ण झाल्याने पाण्डवपक्ष त्यावेळी अत्यंत हर्षमग्न होता व कौरवपक्ष

तितकाच उद्विग्न पण बदला घेण्याच्या ईर्षेने भरला होता. या रात्रीचे वर्णनही पहिल्या तिथिगणनेचे समर्थन आणि दुसरीचे पूर्ण खंडन करिते. ते तिसऱ्या गणनेच्या कृष्ण नवमीचेही समर्थन करते काय? त्या रात्रीच्या पूर्वार्धापर्यंत तर दोन्हीमध्ये समन्वय होऊ शकतो. परंतु वाचकांना स्मरतच असेल की, महर्षि व्यासांनी याच रात्रीच्या उत्तरार्धात सूर्योदयाच्या तीन मुहूर्त पूर्वी चन्द्रोदय झाल्याचे सांगितले आहे ( द्रोणपर्व, १८६-१ ). कृष्ण नवमीचा चन्द्रोदय त्याच्याही काही अगोदर होतो, पण कृष्ण द्वादशीचा सुमारे त्याच वेळी होतो.[३०]

## व्यासांच्या मार्मिकतेची कमाल—त्यांचा मूळ शब्द

अशा प्रकारे लढाईच्या विभिन्न दिवसांच्या सूर्यास्तसमयीचे हे मार्मिक संकेत तिथिनिर्णयाच्या दृष्टीने विशेष महत्त्वाचे असून, ज्या दिवसांचा मी येथे स्पष्ट उल्लेख केला नाही त्यांचीही वर्णने या प्रतिपादनानुसार निश्चित होणाऱ्या उपरिनिर्दिष्ट प्रथम तिथिगणनेचीच संपूर्ण पुष्टी करताना आढळून येतील. या संबंधात चाणाक्ष वाचकांच्या ध्यानांत हे आलेच असेल की, वरील विवेचनात मी लढाईच्या आठव्या दिवसाचा उल्लेख केलेला नाही. आणि यामुळे त्या दिवशीचे महाभारतातील वर्णन माझ्या तिथिगनेणेशी विसंगत आहे की काय अशीही शंका त्यांच्या मनात येणे शक्य आहे. तिचे निरसन करतो. मौज अशी आहे की, त्या दिवसाच्या वर्णनात व्यासांनी आपल्या शाब्दिक सूक्ष्मतेची पुन: कमाल केली असल्याने तिचा वेगळा विचार मी करू इच्छितो.

त्या दिवशीच्या युद्धस्थगनाच्या उल्लेखात संजय धृतराष्ट्राला म्हणतो—

---

३०. बहुधा याच कारणास्तव तिसऱ्या गणनेत काही विद्वान युद्धारंभ शुक्ल एकादशीला न मानता त्रयोदशीला मानतात; त्यायोगे लढाईचा लागोपाठ चौदावा दिवस कृष्ण एकादशीला येऊ शकतो. परंतु याने चौदाव्या दिवसाच्या रात्रीचे समर्थन झाले तरी, लढाईच्या पहिल्या, सहाव्या व सातव्या दिवसांच्या संध्याकाळच्या वर्णनाशी विसंगतीच राहते.



परस्परं समासाद्य तव तेषां च संयुगे ।
तेषु श्रान्तेषु भग्नेषु मृदितेषु च भारत ।। भीष्मपर्व, ९६–७८ ।।
रात्रिः समभवत् तत्र नापश्याम ततोऽनुगान् ।
ततोऽवहारं सैन्यानां प्रचक्रुः कुरुपाण्डवाः ।।७९।।
रजनीमुखे सुरौद्रे तु वर्तमाने महाभये ।
अवहारं ततः कृत्वा सहिताः कुरुपाण्डवाः ।
न्यविशन्त यथाकालं गत्वा स्वशिबिरं तदा ।।८०।।

याचा अर्थ असा की, "त्यावेळी कौरवपांडवांच्या सेना युद्धात परस्परांशी भिडून उभय पक्षांचे सैनिक अत्यंत थकले, कित्येक पळून जाऊ लागले आणि कित्येक मारलेही गेले. या परिस्थितीत रात्र प्राप्त झाली आणि आम्हाला आमचे मागचे सेवक नीट दिसेनात. त्यावेळी कौरवपांडवांनी आपापल्या सैन्याला परतण्याचा आदेश दिला. तदनंतर अत्यंत रौद्र व महाभयंकर भासणाऱ्या त्या रात्रिप्रारंभकाली कौरव व त्याबरोबरच पांडवही युद्धापासून निवृत्त होऊन शिबिरात पोचले व यथाकाल विश्राम करू लागले." आता प्रश्न असा की, यात म्हटल्याप्रमाणे त्यावेळी संजयादि योद्ध्यांना आपले अनुचर — म्हणजे योद्ध्यांसाठी बाणादि आयुधांचा पुरवठा करीत त्यांच्या मागे चालणारे सेवक—दिसेनातसे झाले. मग, त्यावेळेस आसमंतात सर्वत्र अंधार पसरला होता की काय? पण प्रथम गणनेनुसार तर त्या रात्री शुक्ल चतुर्दशी होती. हा विरोध कसा?

येथे सुरवातीस उल्लेखनीय एक गोष्ट म्हणजे या श्लोकात 'नापश्याम ततोऽनुगान्' या ऐवजी महाभारताच्या काही पोथ्यात 'नापश्याम ततो रणम्' असा पाठभेद असून, भांडारकर संस्थेने तो अधिकृतही मानला आहे. पण याचा अर्थ उघडच त्यावेळी समग्र रणभूमीच दिसेनाशी झाली ( इतका घोर अंधार पसरला होता ) असा होऊन, हे वर्णन पहिल्या तिथिगणनेची शुक्ल चतुर्दशी व त्याप्रमाणेच द्वितीय गणनेची शुक्ल सप्तमी या दोघांच्याही स्पष्टपणे विरुद्ध आहे. यासाठी 'नापश्याम ततोऽनुगान्,' या पाठाचा विशेष विचार करून पाहू.

या संबंधात प्रथमच ध्यानात घ्यावयाचे ते हे की, या आठव्या दिवशीही, सहाव्या व सातव्या दिवसाप्रमाणे, लढणे सूर्यास्तानंतरही काही वेळ चालू राहिले होते. या दिवशीच्या सूर्यास्ताचा उल्लेख पुढील स्थळी आहे--

**एवं तव बलं सर्वं हैडिम्बेन दुरात्मना ।**
**सूर्यास्तमनवेलायां प्रभग्नं विद्रुतं दिशः ।।**
( भीष्मपर्व, ९४-५० )

म्हणजे असे की, सूर्यास्तसमयी घटोत्कचाच्या भयंकर पराक्रमामुळे कौरवसेना त्राहि भगवन् करू लागली. यानंतर दुर्योधन भीष्माजवळ गेला. भीष्मांनी त्याला समजावून भगदत्ताला घटोत्कचाच्या प्रतिकारार्थ पाठविले. यावर पुन: भयानक युद्ध भडकले ( अध्याय ९५ ). अर्थात् ही घटना सूर्यास्तानंतर झाली. मात्र कूटाचे वातावरण निर्माण करून वाचकांना भ्रमित करण्यासाठी महाभारतकारांनी सूर्यास्तानंतर झालेल्या या लढाईच्या वर्णनात मध्येच भीष्मसंग्रामाचाही एक उल्लेख करून ठेवला आहे ( ९६।१५ ). पण ते काही असले तरी आताच म्हटल्या-प्रमाणे भगदत्त–घटोत्कच संग्राम सूर्यास्तानंतरच झाला यात संदेह नाही. घटोत्कच निशाचर असल्याने त्याचे बळही त्या विशिष्ट समयी विशेष वाढत असे. पण याचे अन्यही काही संकेत आढळतात. घटोत्कचाने भगदत्तावर फेकलेला त्रिशूळ ‘ विस्फुलिङ्गमालाभिः समन्तात् परिवेष्टितः’ (९५।६०) म्हणजे ‘ अग्निस्फुलिंगांच्या मालिकेने चारीकडून वेष्टिलेला ’ दिसत होता. असे स्फुलिंग सूर्यास्तानंतरच दृश्यमान होऊ शकतात. शिवाय हा संग्राम होता होता ‘ रात्रिः समभवत् तत्र ’ असे म्हटले आहे, त्यावरूनही तो सूर्यास्तानंतरच झाला हे सिद्ध होते. वर भीष्मनिधन-तिथीच्या संदर्भात सांगितल्याप्रमाणे शुद्ध शास्त्रीय परिभाषेनुसार रात्रि ( किंवा रजनी ) ही निशेपेक्षा काहीशी लहान असून, तिच्यात उभय बाजूंचे संध्याकाळ समाविष्ट होत नाहीत. सूर्यास्त होताच ‘ निशा ’ आरंभ होते; आणि काही वेळानंतर ‘ रात्रि ’ समय आरंभ होतो. जेथे सूर्यास्तानंतर तत्काल येणाऱ्या क्षणांचा संबंध असेल तेथे हामकवि



‘ रात्रि ’ शब्द न वापरता ‘ निशा ’ किंवा नुसता ‘ संध्याकाल ’ शब्द वापरतात; उदाहरणार्थ पाहा. द्वितीय दिबसाचे वर्णन ( भीष्मपर्व ५५। ४३ ), तृतीय दिवसाचे वर्णन ( ५९।१३३ ); चवथ्या दिवसाचे वर्णन (६४।८१,८६), पाचव्या दिवसाचे वर्णन (७४।३७), सातव्या दिवसाचे वर्णन (८६।५२), तेराव्या दिवसाचे वर्णन ( द्रोणपर्व, ५०।३;७२।१) आणि पंधराव्या दिवसाचे वर्णन ( कर्णपर्व, १०।५ ).

यानंतर दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे घटोत्कच–भगदत्तसंग्राम अशा प्रकारे सूर्यास्तानंतर झाला असला तरी त्याच्या वर्णनात अंधाराचा कोठेही उल्लेख आढळत नाही. अर्थात् पूर्वीच्या दोन दिवसाप्रमाणे येथेही साहजिकच चन्द्रप्रकाश सूचित होतो. जेव्हा अंधार असतो तेव्हा महाकवि तसा स्पष्ट उल्लेख करतात हे आपण पाहिलेच आहे.

पण मग सूर्यास्तानंतर जर लढाई चालू राहिली व शिवाय चन्द्र-प्रकाशही होता, तर काही वेळानंतर ‘ नापश्याम ततोऽनुगान् ’ कसे म्हटले ? येथे महर्षि व्यासांचा मार्मिक आशय पाहा. स्वतः संजय त्या युद्धात कौरवांकडून प्रत्यक्ष लढत असे, हेही वर सांगितलेच आहे. तो नुसताच पुराणिक किंवा ‘ संवाददाता ’ नव्हता. आणि संजय येथे ‘ आम्हाला अर्थात् कौरव सैन्याला आपले अनुचर दिसेनासे झाले ’ असे म्हणत आहे. आता महाभारतकारांनी हेही सांगून ठेवले आहे की, त्या युद्धात कौरव सैन्याने रणभूमीची पश्चिम बाजू व्यापली होती--

**ते समेत्य यथान्यायं धार्तराष्ट्रा महाबलाः ।**
**कुरुक्षेत्रस्य पश्चार्धे व्यवातिष्ठन्त दंशिताः ।।**
( उद्योगपर्व १९५।११ )

याचाच अर्थ असा होतो की लढताना कौरव सेनेचे तोंड पूर्व दिशेकडे असे. हे सर्व नीट विचारात घेतले म्हणजे संजयाच्या वरील उद्गारांचा हा आशय स्पष्ट होतो की, त्या रात्रिप्रारंभकाली ( शुक्ल चतुर्दशीचा ) स्वच्छ चन्द्रप्रकाश समोरून आमच्या अंगावर पडत होता व म्हणून आमची स्वतःची छाया आमच्या मागे आमच्या अनुचरांवर पडून ते

आम्हाला नीट दिसेनासे झाले. ती छायाही एक दोन माणसांची नव्हे; तर अगणित हत्ती, रथ इत्यादींनी युक्त पुऱ्या विशाल सैन्याची !

या उलट जेव्हा चंद्रप्रकाशरहित शुद्ध अंधाराचीच कल्पना व्यक्त करावयाची असते तेव्हा महाभारतात एकवार नव्हे अनेकवार स्पष्ट म्हटले आहे की, त्या वेळी कोणालाही काहीच मागे अगर पुढे दिसत नव्हते. लढाईच्या प्रथम दिवसाचे (अमावास्येचे), नवव्या दिवसाचे (कृष्ण प्रतिपदेचे) व अकराव्या दिवसाचे (कृष्ण पंचमीचे) सायंकालीन वर्णन नुकतेच वर उद्धृत केले आहे ते या संदर्भात वाचकांनी पुनः पहावे. त्याशिवायही चवदाव्या दिवशीच्या (कृष्ण द्वादशीच्या) पूर्वरात्रिकालाचे वर्णन पाहा—

**तमसा चावृते लोके न प्राज्ञायत किंचन ।।**

(द्रोणपर्व, १६।४९)

आणि तसेच लढाईच्या सोळाव्या दिवशी ( अमावस्येला ) सूर्यास्त होताच—

**गिरिमस्तं समासाद्य प्रत्यपद्यत भानुमान् ।।** (कर्णपर्व, ३०।३७)
**तमसा च महाराज रजसा च विशेषतः ।**
**न किंचित् प्रत्यपश्याम शुभं वा यदि वाशुभम् ।।३८।।**

बरे, आणखी एक खुलासा पाहा. जर समोरून येणाऱ्या चंद्रप्रकाशामुळे कौरव सैनिकांच्या पाठीमागे पडणाऱ्या छायेचीच अडचण होती तर शुक्ल चतुर्दशीला ती प्रत्यक्ष सूर्यास्तापासूनच व्हावयास पाहिजे; मग घटका दोन घटका आणखी जाऊन रात्रिप्रारंभकालापावेतो तरी लढाई चालू का दाखविली ? याचे उत्तर – अस्तंगत सूर्याच्या लालिमेचा संधिप्रकाश संध्याकालात (निशारंभघटिकांत) पश्चिमेकडून, म्हणजे कौरवसैन्याच्या पाठीमागून, येत राहिला; पण रात्रिप्रारंभापावेतो तोही बंद झाला आणि उलट पूर्वेकडे चंद्राचे (जवळजवळ पूर्ण) बिंब क्षितिजाच्या स्पष्टपणे वर चढून त्यामुळे समोरून येणाऱ्या प्रकाशकिरणांनी पश्चिमेकडील छाया अधिकच दाट भासू लागली.



अशा प्रकारे ‘ नापश्याम ततोऽनुगान् ’ हे सूक्ष्म वर्णन कौरव सैन्याची पाठीमागे पडणारी छाया दिग्दर्शित करीत असून, आठव्या दिवशीच्या शुक्ल चतुर्दशीशी पूर्णपणे सुसंगत आहे. आणि या संशोधनात व्यक्त होणारी महाभारतयुद्धाची एकंदर कालगणनात्मक रहस्ये व युद्धारंभघोषणेपासून भीष्मनिधनापावेतोची सारी तिथिगणना बरोबर असेल, तर लढाईच्या आठव्या दिवशीच्या वर्णनात ‘ नापश्याम ततो रणम् ’ असा महाभारतकारांचा मूळ पाठ असणे असंभवनीय असून, ‘ नापश्याम ततोऽनुगान् ’ हाच मूळ पाठ सिद्ध होतो. इतकेच की, त्यांचा मार्मिक आशय न जाणण्यामुळे कोणीतरी त्यात ‘ अनुगान् ’ ऐवजी ‘ रणम् ’ शब्द नंतर घातला असला पाहिजे. त्याचेही स्वाभाविक कारण असे की, नवव्या दिवशीच्या वर्णनात स्वतः महाभारतकारांनी सूर्यस्तानंतर ‘ नापश्याम ततो रणम् ’ असे शब्द संजयाच्या तोंडी घातले आहेत. आणि तेथे ते पूर्णपणे योग्यही आहेत; का की आपल्या तिथिगणनेनुसार त्या दिवशी कृष्ण प्रतिपदा होती. पण आठव्या दिवशीची तिथी अगदीच वेगळ्या प्रकारची होती. आणि शिवाय जर मूळ महाभारतात आठव्या दिवसाच्या वर्णनातही तेच शब्द असते तर त्यांच्या जागी ‘ नापश्याम ततोऽनुगान् ’ असा वस्तुतः सूक्ष्मार्थाचा पण वरवर पाहता अगदीच निरर्थक दिसणारा पाठ आणखी कोणी नंतर घालण्याचे काही कारण दिसत नाही.

माझ्या माहितीप्रमाणे महाभारतातील या सूक्ष्म संकेतांकडे आतापावेतो लक्ष दिले गेले नाही. परंतु त्यावरूनच अवकाशदिवसाची पुष्टि होत आहे. आणि याहूनही अधिक आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्या युद्धात कित्येक दिवस सूर्यास्तानंतरही लढाई चालू राहण्याच्या या उल्लेखांकडे केवळ तिथ्यांच्या दृष्टीनेच नव्हे तर इतक्या पूर्णपणे दुर्लक्ष केले गेले की, महाभारत युद्ध दररोज बरोबर सूर्यास्तावर समाप्त होत असे, अशीही एक सर्वसाधारण चुकीची समजूत प्रसृत होऊन बसली ! वस्तुतः तसे प्रतिदिवशी झाले नाही; आणि कौरव-पांडवांचा तसा युद्धनियमही नव्हता. गोष्ट इतकीच की, कौरव-पांडवांचे उभयसंमत युद्धनियम महाकवीने ज्या शब्दांत व्यक्त केले आहेत त्यांतही काही संदिग्ध शब्दप्रयोग आहेत. त्या

नियमांच्या भाषेत युद्धकाळाच्या दरम्यान लढाई स्थगित करण्याच्या संबंधात सूर्यास्त किंवा रात्रिप्रारंभ असा काही उल्लेख आहे की काय हे स्वतः वाचकांनीच नीट पाहून घ्यावे.

## इतरही प्रमुख तिथ्या

आता या सर्व तिथ्यांच्या आधारे त्या महायुद्धाची संपूर्ण सुसंगत दैनंदिनी तयार होत असून ती या लेखाच्या शेवटी दिली आहे. त्यात युद्धसमाप्तीनंतर पांडवांनी नदीतटावर पाळलेल्या आशौचाचा पूर्ण एक महिना बरोबर दाखविला आहे. तो आशौचकाळ केवळ बारा दिवस मोजण्याचे काहीही कारण नाही. जे त्या प्रकारे मोजू पाहतात त्यांचे म्हणणे असे आहे की, आशौच पालनाचे पहिले अठरा दिवस तर युद्धकालाच्या अठरा दिवसातच समाविष्ट केले जावे; का की, लढाईच्या प्रथम दिवसापासूनच योद्धे मरत होते. परंतु पहिली गोष्ट म्हणजे महाकवीने आशौचपालनाचा पुरा महिना युद्धसमाप्तीच्या पश्चात् झालेल्या सामुदायिक दाहक्रियेनंतरच दाखविला आहे. आणि याशिवाय आता सिद्ध होत असल्याप्रमाणे युद्धकालाचे एकूण दिवस अठरा नसून पसतीस होते.

याच प्रकारे पांडवांचा हस्तिनापुरप्रवेश, तेथे युधिष्ठिराला राज्याभिषेक, आणि तत्पश्चात् शरशय्येवर पडल्यापडल्या महात्मा भीष्मांचा अभूतपूर्व धर्मोपदेश आणि नंतरच्या घटनांच्याही क्रमवार तिथ्या आता उपलब्ध होत आहेत. तो उपदेश एकूण पाच दिवस चालला. त्याच्या विशिष्ट तिथ्याही निश्चित होत आहेत. इतकेच नव्हे तर प्रत्येक तिथीला उपदेश कोठपावेतो झाला हेही दाखविणे शक्य आहे. युद्धसमाप्तीनंतर पांडव ताबडतोब हस्तिनापुरास चालले गेले, किंवा युद्धसमाप्ती आणि भीष्मनिधन यांच्या दरम्यान युधिष्ठिराने हस्तिनापुरात पन्नास रात्री घालविल्या, अथवा उपदेशसमाप्ति आणि भीष्मनिधन यांच्या दरम्यान त्याने हस्तिनापुरात पाच वा पन्नास ( वा काही ) दिवस घालविले इत्यादी



सर्व कल्पना भ्रामक आहेत.[३१] या अशा कल्पनांसाठी प्रायः महाभारताच्या पुढील श्लोकाचा आधार घेतला जातो.

**उषित्वा शर्वरीः श्रीमान् पंचाशन्नगरोत्तमे ।**
**समयं कौरवाग्रस्य सस्मार पुरुषर्षभः ।। अनुशासन पर्व १६७-५**

परंतु या श्लोकात एक विलक्षण शाब्दिक कूट असून त्याचा वास्तविक आशय दिसतो त्यापेक्षा वेगळा आहे.

महाभारत युद्ध कालगणनेच्या या चमत्कारिक रहस्यांची काही प्रमाणे या लेखात दिली आहेत. या संशोधनाचे पूर्ण विवेचन ग्रंथरूपाने तयार असून उचित व्यवस्था होताच ते प्रकाशित केले जाईल. दरम्यान जितके विवेचन मी या लेखाच्या मर्यादेत देऊ शकलो आहे, तितकेही महाभारत काव्याची गूढ भासणारी कालगणनात्मक कूटे ( आपण त्यांना 'काल-कूटे' म्हणू या ! ) आता पूर्णपणे सरळ होऊन सुटण्याच्या मार्गावर आहेत इतका विश्वास महाभारताच्या अभ्यासकांत निर्माण करण्यास पुरेसे होईल अशी मी आशा करतो.

## तिथितालिका

कृष्ण सप्तमी :—निष्फळ शांतिवार्ता; श्रीकृष्णाकडून हस्तिनापुरातच युद्धारंभार्थ सात दिवसानंतर येणारी अमावास्या घोषित; त्याच दिवशी श्रीकृष्णाचे ताबडतोब उपप्लव्यास परतणे व पांडवांना वृत्त-कथन. महाभारतात स्पष्ट म्हटल्याप्रमाणे या दिवशी चन्द्राचे पुष्य नक्षत्र. बलरामतीर्थयात्रेचा प्रारंभ.

कृष्ण अष्टमी ते त्रयोदशी :—महाकवीने लिहिल्याप्रमाणे हा कृष्णपक्ष तेरा दिवसांचा होता; अर्थात् त्यांत दोन तिथिलोप होते. म्हणून

---

३१. उदाहरणार्थ पाहा, भांडारकर संस्थेचे 'अनुशासनपर्व' ( पूर्वोल्लिखित ), पृ. ११२१, आणि श्री. गोखले यांचा पूर्वोल्लिखित लेख ( ते देखील भीष्मनिधनतिथि परंपरागत माघ शुक्ल अष्टमीलाच मानतात ).

एक लोप याच्या पूर्वार्धात व दुसरा येथे उत्तरार्धात मानून अष्टमी ते त्रयोदशीपावेतो एकंदर पाच दिवस होतात. आता ज्याअर्थी आगामी अमावास्येला चित्रा नक्षत्र होते, त्याअर्थी या पाच दिवसात एक नक्षत्रवृद्धि आवश्यक आहे. अशा रीतीने येथे एकंदर नक्षत्र आश्लेषा, मघा, पूर्वा व उत्तरा अशी चारच असून यापैकी एकाची वृद्धी आहे. याच दिवसांत उभयसेना कुरुक्षेत्री पोचून शिबिरादिकांची निर्मिति व लढाईचे पूर्वाभ्यासही झाले.

कृष्ण चतुर्दशी :––संजयाची धृतराष्ट्राचा युद्धवार्ताहर म्हणून नियुक्ती. चन्द्र हस्तनक्षत्रात.

कृष्ण अमावास्या :––लढाईचा प्रथम दिवस (गीताजयंती तिथि). चन्द्राचे चित्रा नक्षत्र. बलरामयात्रेचा आठवा दिवस.

मार्गशीर्ष शुक्ल प्रतिपदा :––अवकाश दिवस.

द्वितीया :––लढाईचा दुसरा दिवस.

तृतीया :––अवकाश दिवस.

चतुर्थी :––लढाईचा तिसरा दिवस.

पंचमी :––अवकाश दिवस.

षष्ठी :––लढाईचा चौथा दिवस.

सप्तमी :––अवकाश दिवस.

अष्टमी :––लढाईचा पाचवा दिवस.

नवमी :––अवकाश दिवस.

दशमी :––लढाईचा सहावा दिवस.

एकादशी :––अवकाश दिवस.

द्वादशी :––लढाईचा सातवा दिवस.

त्रयोदशी :––अवकाश दिवस.

चतुर्दशी :––लढाईचा आठवा दिवस.

पौर्णिमा :––अवकाश दिवस. चन्द्रमा कृत्तिका नक्षत्रात. या शुक्ल पक्षांत स्वाती व भरणी यांच्या मध्ये कोणत्या तरी एका नक्षत्राचा लोप आहे. अन्यथा, पौर्णिमेला चन्द्राचे भरणी नक्षत्र



येईल, जे मार्गशीर्ष पौर्णिमेला संभवनीय नाही. जास्तीत जास्त चन्द्र त्या दिवशी मृगापासून दोन नक्षत्रे अलीकडे कृत्तिकेत असू शकेल. हा दोन नक्षत्रांचा फरक मागील पक्षांतील दोन तिथिलोपांशी संबद्ध मानला जाऊ शकतो. पुनः तिकडे पौष शुद्ध पंचमीला श्रवण नक्षत्र निश्चित असल्याने या पौर्णिमेचे नक्षत्र कृत्तिकेहून आणखी अलीकडेही होऊ शकत नाही. स्वाती व भरणी यांमधील अशा प्रकारे लुप्त नक्षत्र नक्की कोणते होते ते आता उपलब्ध होत असलेल्या पर्याप्त आधारांवर त्या दिवसांचे पूर्ण पंचांग तयार केल्यावरच निश्चित होऊ शकेल.

कृष्ण प्रतिपदा :––लढाईचा नववा दिवस.

द्वितीया :––अवकाश दिवस.

तृतीया :––लढाईचा दहावा दिवस. भीष्मपतन; त्यांची शरशय्येवर प्रथम रात्र.

चतुर्थी :––अवकाश दिवस. संजयाचा प्रथम युद्धवृत्तांत (गीतासंवाद–प्रकाशनासह). द्रोणांना सेनापतित्वाचा अभिषेक.

पंचमी :––लढाईचा अकरावा दिवस.

षष्ठी :––अवकाश दिवस.

सप्तमी:––लढाईचा बारावा दिवस.

नवमी :––अवकाश दिवस. या पक्षांत कोठे तरी एक तिथिलोप आहे. त्यायोगे अमावास्येला चन्द्र अनुराधा नक्षत्रात येऊन अन्य ग्रहांची स्थिति बरोबर जुळते. या तिथिक्षयाची पूर्ती पुढे पौष शुक्ल पक्षांत होते.

दशमी :––लढाईचा तेरावा दिवस. अभिमन्युवध.

एकादशी :––अवकाश दिवस.

द्वादशी :––लढाईचा चौदावा दिवस. जयद्रथवध. उत्तररात्री चन्द्रोदय. (अवकाश दिवसाचा अभाव).

त्रयोदशी:––लढाईचा पंधरावा दिवस. द्रोणवध.

४

चतुर्दशी :—अवकाश दिवस. कर्णाला सेनापतित्वाचा अभिषेक.
अमावास्या :—लढाईचा सोळावा दिवस.

पौष शुक्ल प्रतिपदा :—अवकाश दिवस.
द्वितीया :—लढाईचा सतरावा दिवस. कर्णवध.

तृतीया :—अवकाश दिवस. शल्याला सेनापतित्वाचा अभिषेक. बलरामयात्रेचा चाळीसावा दिवस.

चतुर्थी :—लढाईचा साडेसतरावा दिवस. मध्याह्नी शल्यवध. दिवसाच्या उत्तरार्धांत लढाई बंद. दुर्योधनाचा सरोवरप्रवेश. बलरामयात्रेचा एक्केचाळीसावा दिवस.

पंचमी :—लढाईचा अठरावा दिवस. या दिवशी अर्धा दिवस भीम-दुर्योधन गदायुद्ध बलरामयात्रेची बरोबर बेचाळिसाव्या दिवशी समाप्ती. ( कृत्तिकेपासून ) क्रमवार मोजून या दिवशी चन्द्र बरोबर श्रवणांत. मध्यरात्री अश्वत्थाम्याकडून निद्रिस्त पांडवपक्षाची भीषण कत्तल. दुर्योधनमृत्यु. भीष्मांच्या शरशय्येची सतरावी रात्र.

पंचमी ( द्वितीय ) :—सामुदायिक दाहक्रिया. या पक्षांत कोठे तरी एक तिथिवृद्धि आहे; अन्यथा पौर्णिमेला मृग नक्षत्र येईल, जे पौष पौर्णिमेला संभव नाही. तिथिवृद्धीने आर्द्रा येईल. या वृद्धीने मागील कृष्णपक्षाच्या तिथिक्षयाची पूर्ती होऊन शरशय्येच्या अठ्ठावन रात्रीही बरोबर पूर्ण होतात.

पौष शुक्ल षष्ठी ते माघ शुक्ल पंचमी :—( तीस दिवसांचा पूरा महिना ). पांडवांचे आशौचपालन. भीष्मांच्या शरशय्येवर एकोणीस ते अठ्ठेचाळीस रात्री.

माघ शुक्ल षष्ठी, सप्तमी, अष्टमी, नवमी :—पांडवांचा हस्तिनापुर प्रवेश. युधिष्ठिराला राज्याभिषेक. भीष्मांच्या शरशय्येवर ४९ ते ५२ रात्री.

दशमी :—युधिष्ठिर आणि श्रीकृष्ण यांची भीष्मांना धर्मोपदेशार्थ विनंती. भीष्मांची शरशय्येवर त्रेपन्नावी रात्र.



एकादशी, द्वादशी, त्रयोदशी, चतुर्दशी, पौर्णिमा :—भीष्मांचा महान धर्मोपदेश. त्यांच्या शरशय्येवर ५४ ते ५८ रात्री. अठ्ठावन्नाव्या रात्रीच्या समाप्तिसमयी माघ पौर्णिमेच्या उषःकालांत महात्मा भीष्माचार्यांचे प्राणोत्क्रमण.

अशा प्रकारे महाभारतात सूचित युद्धकालांतील ( गुप्त ) अवकाश-दिवस, त्यांतही ( एक ) अपवाद, लढाईच्या शेवटच्या दिवसाचे ( दोन तिथ्यांत ) विभाजन, सर्व मिळून एकंदर युद्धकालाचे ( पसतीस ) दिवस, युद्धारंभाचे ( चित्रा ) नक्षत्र, भीष्मनिधनाची अत्यंत गूढ ( पौर्णिमा ) तिथि व ( उषःकालची ) वेळ इत्यादी सर्व रहस्ये लक्षात घेतल्यानंतरच महाभारत काव्याची युद्धविषयक पुरी कालगणना सुसंगत उपलब्ध होते. याचप्रमाणे वनवासप्रारंभ, अज्ञातवाससमाप्ति आदि युद्धपूर्व घटनांचीही सूक्ष्म कालगणना आता हस्तगत झाली आहे. हे सर्व दृष्टिगत केले म्हणजे जे एक भव्य चित्र तयार होते त्याने महाभारतकार व महाभारतकाल या दोहोंवर अधिक प्रकाश पडेल असा विश्वास वाटतो. याशिवाय या सर्वांचा आणखी एक महत्त्वाचा परिणाम म्हणजे महाभारताच्या उपलब्ध विभिन्न पाठांतून मूळ पाठ निश्चित करण्यात या कालगणनात्मक रहस्यांचाही आता अवश्य विचार करावा लागेल. तो पाठ यांशी विसंगत असेल तर त्याला अनधिकृत मानावे लागेल; आणि उलट जो सुसंगत असेल त्याचा विशेष विचार करावा लागेल.

शेवटी एक खुलासा इष्ट आहे. या संशोधनात महाभारतातील कालगणनात्मक अनेक दीर्घकालीन कूटांचा आता सरळ उलगडा होत आहे असे वर म्हटले आहे. पण महाभारताचे अध्ययन शतकानुशतके व एक दोन भाषांतच नव्हे तर अनेक भाषांत, आणि तेही सर्व हिन्दुस्थानात व बाहेरही आस्थापूर्वक होत आहे. त्या सर्वांचे अवलोकन कोणा एक व्यक्तीस प्रायः असंभवनीय आहे. म्हणून माझ्या माहितीतील अनेक पूर्वाध्ययनांचा मी वर उल्लेख केला असला तरी ( माझ्या भाषाविषयक व अन्यही मर्यादा पाहता ) त्या व्यतिरिक्तही आतापावेतो उपेक्षित म्हटलेल्या काही मुद्यांचा स्पष्ट किंवा अस्पष्ट विचार यापूर्वीही अन्य

कोणी केला असणे अगदी असंभवनीय म्हणता येणार नाही. आणि तसे निदर्शनास आल्यावर या विषयाच्या अध्ययनात त्याचाही विचार उचितच होईल. म्हणून येथे प्रतिपादिलेल्या तिथिगणनेने महाभारताची प्राचीन कालगणनात्मक कूटे सुसंगत रीत्या सुटतात की नाही इतक्याच विचारावर विद्वानांनी मुख्यतः तूर्त लक्ष केंद्रित केले तरी मला आनंद होईल. अशा देशदेशांतरव्यापी व दीर्घकालीन अध्ययनाच्या विषयात अंतिम मौलिकतेचा शेवटचा निर्णय कालान्तराने करून आपोआपच दिला जाईल आणि मला याचीही जाणीव आहे की, जेव्हा केव्हा तो दिला जाईल, त्यानंतर काळाच्या आणखी ओघात त्याचेही महत्त्व नष्ट होऊन, केवळ महाभारतकार विभूतींची प्रासादिक वाणी व तिचा वास्तविक अर्थ इतकेच साधारणपणे जनतेच्या ध्यानात राहील व ते राहिले म्हणजे पुरे ! मध्यंतरी, महाभारताची ही तिथिगणना सर्वमान्य झाली की असे हे प्रचंड अद्‌भुत महाकाव्य निर्माण करूनही स्वतःचे नावगाव गूढ ठेवणारा त्याचा खरा कर्ता, त्याने संकल्पिलेले भारतीय युद्धाचे विशिष्ट वर्ष, महाभारताचा रचनाकाल, आदि अन्य पुढील प्रश्नांकडे ताबडतोब वळणे इष्ट होईल.

---

## परिशिष्ट

नागपूर येथे विदर्भ साहित्य संघात 'महाभारतातील कालगणनात्मक कूटां'वर मी दिलेल्या व्याख्यानप्रसंगी सुप्रसिद्ध संशोधक महामहोपाध्याय डॉ. नानासाहेब मिराशी यांनी सन १९२१ च्या विविधज्ञानविस्तारातील ज्या दोन लेखांकडे लक्ष वेधले त्यांचा येथे वेगळा विचार करितो. प्रथम श्री. रामचन्द्र लक्ष्मण गोखले यांचा "भारतीय युद्ध एक दिवसाआड होत होते" हा लेख प्रकाशित झाला. नंतर डॉ. के. ल. दप्तरी यांनी त्याचे खंडन करून "भारतीय युद्ध एक दिवसाआड होत नव्हते" हा लेख लिहिला.



यावरून भारतीय युद्ध एक दिवसाआड होण्याची व मधल्या अवकाश-दिवसात रणभूमी साफ केली जाण्याची कल्पना त्यावेळी व्यक्त झाली होती हे खरे. मात्र डॉ. दप्तरी यांच्या खंडनानंतर श्री. गोखले यांनी तिचा पाठपुरावा केल्याचे दिसत नाही. डॉ. दप्तरी यांनीही नंतर आपल्या पुस्तकांत तिचा उच्चारही केलेला दिसत नाही. इतकेच नव्हे तर डॉ. काणे, डॉ. बेलवलकर व भांडारकर संस्थेचे संपादक आदि इतरही कोणी तिचा उहापोह किंवा उल्लेखही केल्याचे आढळून येत नाही.

याचे एक प्रमुख कारण असे असावे की, स्वतः श्री. गोखले यांच्या लेखात ती कल्पना फार चमत्कारिक स्वरूपात व्यक्त झाली आहे. त्यांचे प्रतिपादन असे आहे की, महाभारत युद्ध प्रत्यक्ष घटना म्हणून तत्कालीन प्राचीन युद्धरीतीप्रमाणे एक दिवसाआड झाले असले पाहिजे, पण नंतर लिहिलेल्या महाभारत काव्याच्या विभिन्न लेखकांपैकी अनेकांना त्याची जाणीव नसल्याने महाभारतात त्या घटनेशी विसंगत असे अनेक श्लोक लिहिले गेले आहेत. श्री. गोखले अमावास्येला युद्धारंभ मानून एक दिवसाआड युद्ध मोजून चौदाव्या दिवशीचा उत्तर रात्रीचा चन्द्रोदय सिद्ध करू पाहतात; पण त्यानंतर युद्धाचे शेवटचे चार दिवस मात्र (काहीही विशेष कारण न देता) ते लागोपाठ दररोज लढाई मानतात ! तसे केल्याशिवाय त्यांना गदायुद्धाचे श्रवण नक्षत्र जमणार नाही ! आणखी दुसरी चमत्कारिक गोष्ट म्हणजे भीष्मपतन व भीष्मनिधन यांच्या तिथ्या श्री. गोखले युद्ध दररोज चालले याच आधारावर मोजतात ! म्हणजे चौदाव्या दिवशीच्या चन्द्रोदयासाठी युद्ध एक दिवसाआड मानावयाचे; पण त्याच वेळी दहाव्या दिवशीच्या भीष्मपतनासाठी मात्र ते दररोज मानावयाचे असला विलक्षण व विसंगत प्रकार त्यांनी केला ! साहजिकच डॉ. दप्तरी यांनी एक दिवसाआड युद्धाच्या कल्पनेची विशेषता मान्य करूनही श्री. गोखले यांची कालगणना नाकारली; व ती गोष्ट तेथेच राहिली; आणि डॉ. दप्तरी युद्ध दररोज चालले याच आपल्या कल्पनेस चिकटून राहिले. त्यांनी एक दिवसाआड युद्धाच्या कल्पनेकडे केवळ श्री. गोखले यांच्या लेखाच्या दृष्टिकोनातून पाहिले असे

दिसते. श्री. गोखले यांना युद्धानंतर पांडवांनी केलेल्या सामुदायिक दाहक्रियेचे महाभारतातील सारे वर्णनही एक दिवसाआड युद्धाच्या कल्पनेच्या विपरीत वाटते. केवळ चवदाव्या युद्धदिवशी उत्तर रात्रीच्या चन्द्रोदयाच्या उल्लेखात त्यांना अवकाशदिनाची सूचना दिसते. पण तेथेही मूळ भारतात तो दिवस युद्धारंभापासून ( अमावास्येपासून ) लागोपाठ चवदावा दिवस ( शुक्ल त्रयोदशी ) म्हणूनच वर्णिला असावा, आणि मागाहून कोणी तरी तो दिवस ( अवकाशदिवस मोजून ) सत्ताविसावा सुचविण्यासाठी चन्द्रोदयाची वेळ कशी तरी बदलून उत्तररात्री दाखविली असावी ( पण तसे करतानाही चन्द्रप्रकाशाच्या तीव्रतेच्या वर्णनात विसंगती राहूनच गेली ) असे त्यांना वाटते! श्री. गोखले यांच्या कालगणनेने बलरामाच्या यात्रेचे एकूण बेचाळीस दिवसही बरोबर जमत नाहीत. ते चौदाव्या युद्धदिवसानंतरही अवकाश मानतात; पण वस्तुतः त्याच एका दिवशी अवकाशदिवस नव्हता! आणि युद्धकालाचे ते एकूण बत्तीसच दिवस मोजतात. यात युद्धारंभीच्या अमावास्येच्या पूर्वीचे सात दिवस मिळवून बलरामाच्या यात्रेचे ३९ दिवसच होतील, बेचाळीस होत नाहीत. शिवाय गदायुद्ध शल्यवधाच्या दुसऱ्या दिवशी झाले याची, आणि विशेष म्हणजे भीष्मनिधनतिथीच्या "त्रिभागशेष" पौर्णिमेच्या रहस्याची श्री. गोखले किंवा डॉ. दप्तरी यांना कल्पनाही नव्हती. आणि त्या दोघांचे ( इतर कित्येकांप्रमाणे ) युद्धारंभदिनाचे नक्षत्र ज्येष्ठा होते; पण ते वस्तुतः चित्रा आहे. या सर्व कारणांमुळे कौरव–पांडव–युद्ध एक दिवसाआड होत होते या मूळ कल्पनेवर आधारित मी शांतिवार्तेच्या दिवसापासून भीष्मनिधनापावेतो जी नक्षत्रांसहित तिथिगणना जमविली आहे, तिच्यावर श्री. गोखले यांचे डॉ. दप्तरींनी जे खंडन केले त्याचा प्रभाव पडत नाही हे सहज कळून येईल.

श्री. गोखले यांच्या लेखानंतर इतर काहींनी तर त्यांच्या कल्पनेचे अगदीच विडंबन केले असे डॉ. दप्तरींच्या लेखावरून दिसते. भीष्म कधी एक दिवसाआड तर कधी दोन दिवसाआड युद्ध करीत असेही आपापल्या मतानुसार तिथ्या जमविण्यासाठी म्हटले गेले!



सारांश, श्री. गोखले यांच्या मनात कोणत्याही स्वरूपात व प्रमाणात का होईना एक दिवसाआड युद्धाची कल्पना चमकून गेली; व तेवढ्या पुरते त्यांना श्रेय देणे उचितच आहे. पण ती कल्पना प्राचीन भारतीय युद्धपरंपरेच्या त्यांनी वाचलेल्या कोणत्या तरी माहितीवर आधारलेली होती (हे त्यांनी कोठे वाचले हे स्पष्ट नाही); खुद्द महाभारतातील कूटस्थलांच्या स्पष्टीकरणावर नव्हे व शिवाय खुद्द मूळ महाभारत काव्याशी मात्र त्यांनी तिचा विरोधच दर्शविला. आणि म्हणूनच ती इतक्या विसंगत व अपूर्ण स्वरूपात व्यक्त झाली व विराम पावली. माझ्या मताने प्रत्यक्षात असे एक दिवसाआड युद्ध खरोखरच झाले असेल किंवा नाही हे आज तरी निश्चित सांगता येत नाही, पण महाभारत काव्याच्या महान रचयित्याने मात्र याच मूलभूत रहस्यमय कल्पनेच्या आधारावर युद्धारंभापासून भीष्मनिधनापावेतो तिथ्यांची, दिवसांची व नक्षत्रांची सूक्ष्म गणना करून अनेक गूढ कूटस्थळे आपल्या अपूर्व प्रतिभाकौशल्याने निर्माण करून ठेविली आहेत. या मूलभूत कल्पनेशी विसंगत अशी अनेक स्थळे महाभारतात आहेत असे श्री. गोखले यांना वाटते ते बरोबर नसून, या आपाततः विसंगत दिसणाऱ्या श्लोकांच्या मुळाशीही कूटरूपाने तेच रहस्य आहे व हेच मी प्रत्यक्ष महाभारतातील श्लोकांच्या सूक्ष्म विश्लेषणाने सिद्ध करीत आहे. या स्पष्टीकरणामुळे महाभारत युद्धाचे वर्ष, महाभारत काव्याचा कर्ता, लेखनकाल इत्यादी प्रश्नांवरही महत्त्वपूर्ण प्रकाश पडणार आहे.

---

# महाभारत युद्धाची कालगणनात्मक रहस्ये

## (गीता जयंतीची वास्तविक तिथि)

**स्व. डॉ. सम्पूर्णानंद (माजी मुख्यमंत्री उ. प्र.; व राज्यपाल राजस्थान):–** "आपले हे महान कार्य...आपल्या काही संशोधनाच्या प्रतिपादनार्थ आपण एकदोन दिवस वाराणशीला येऊ शकाल काय? आपल्या प्रत्येक पत्राने माझी तृष्णा तीव्र होऊन जिज्ञासा वाढत आहे...आपण या विषयावर टाकलेला नवा प्रकाश सर्वथैव स्वागतार्ह असून विद्वानांनी त्यावर गंभीर लक्ष दिले पाहिजे."

**म. म. पंडित परमेश्वरानंद, विद्याभास्कर, (भारत सरकार द्वारा सन्मानपत्र–विभूषित; माजी सदस्य, केन्द्रीय संस्कृत बोर्ड, दिल्ली):—** "आपल्या विद्वत्तापूर्ण व्याख्यानांनी श्री. लालबहादुर शास्त्री राष्ट्रीय संस्कृत विद्यापीठ गौरवान्वित झाले आहे; आणि विद्वानांना महाभारत-युद्धविषयक अनेक प्रचलित समजुतींवर पुनर्विचाराची प्रेरणा प्राप्त झाली आहे...यामुळे अनेक न सुटलेले प्रश्न सुटू शकतील. पाश्चात्य विद्वानांचेही डोळे उघडतील. महाभारताच्या असंलग्न श्लोकांचे तात्पर्यही स्पष्ट होईल."

**डॉ. शिवमंगलसिंह 'सुमन', कुलपति, विक्रम विश्वविद्यालय, उज्जेन:—** "महान शोधकार्य...आपल्यासारख्या विद्वानांमुळे विक्रम विश्वविद्यालय विशेषतः, व भारतवर्ष सामान्यतः, गौरवान्वित होत आहे."

**श्री. का. ल. जोशी, कुलपति, इन्दूर विश्वविद्यालयः—** "प्रा. कवीश्वरांनी महाभारतकालगणनेच्या क्षेत्रात एक नवी दृष्टी दिली असून कौरवपांडवयुद्धकाळाचे मौलिक तर्कसंगत स्पष्टीकरण केले आहे.





माझ्या मताने, महाभारताच्या विद्वान अभ्यासकांकडून प्रा. कवीश्वरांच्या प्रतिपादनाचा गंभीर विचार झाला पाहिजे."

**स्व. डॉ. शं. गो. वाळिंबे, अध्यक्ष, मराठी विभाग, इन्दूर विश्वविद्यालय** 'विशेष लेख':—" गौरव ग्रंथ. महाभारतासंबंधी प्रा. कवीश्वरांचा क्रांतिकारी शोध."

**प्रा. अवधूत शास्त्री, संस्कृत विभाग, दयानंद कॉलेज, मुंबई** ('भारत ज्योती'त विशेष लेख):—" महाभारताची रहस्ये—एक वाङ्मयीन शोध."

**आचार्य अत्रे संपादित दैनिक 'मराठा' (मुंबई)** मध्ये प्रकाशित वृत्तः—प्रा. कवीश्वरांच्या या अत्यंत मूलगामी संशोधनाने महाभारताच्या अध्ययनात एका नवीन युगास प्रारंभ झाला आहे...त्यांनी आता सिद्ध केल्याप्रमाणे खरी गीताजयंती तिथी कार्त्तिक अमावास्या असून भीष्म-निधन तिथी माघ पौर्णिमा आहे. भारतीय पंचांगात व परंपरेत आता या तिथ्या रूढ करणे निःसंशय आवश्यक झाले आहे...महाभारताच्या अधिकृत पाठाबद्दलही कित्येक स्थळी पुनर्विचार करावा लागेल."

**गोव्याचे प्रमुख दैनिक 'गोमंतक',** (अग्रलेख):—"...नवीन शोधामुळे गीताजयंतीची तिथी बदलण्याची वेळ आता आली आहे व तिचा सर्वांनी गंभीरपणे विचार केला पाहिजे असे आम्हास वाटते..."

**नागपूर टाइम्स्,** वृत्तशीर्षकः—" भारतीय युद्ध तिथ्या निश्चित झाल्या. कवीश्वरांचा शोध."

---

# या लेखकाची काही इतर पुस्तके

## THE METAPHYSICS OF BERKELEY

" This analysis of Berkeley's philosophy by an Indian scholar is in many ways an achievement of unusual merit. ... He has a real aptitude for the clear explanation of recondite ideas and a sound faculty of philosophical discrimination.

LONDON TIMES.

" An admirable exposition of the leading themes in Berkeley's Principles and Dialogues.... I respect the achievement..... He gives ample proof of right to stand without support of the western authorities and to differ from them without apology "— PHILOSOPHY, LONDON. " Yonr notable contributions to the history of Berkeley's Philosophy "— Dr. G. A. JOHNSTON, (GENEVA). " A scholarly study.... The exposition is clear, the treatment sympathetic, the criticisms acqute "—PROFESSOR C. E. M. JOAD (ENGLAND). " It is a pity that our scholars do not bring out such books in abundance "— PRABUDDHA BHARAT OR AWAKENED INDIA.





## नीति आणि कलोपासना

( संशोधित वर्धित द्वितीयावृत्ती )

नागपूर, मुंबई, बडोदे, कर्नाटक, पुणे आदि विद्यापीठांनी उच्चाभ्यासार्थ पाठ्यक्रमांत नेमलेले, " रावराजे वाङमय पारितोषिक " (गोवा) प्राप्त पुस्तक. " दोन्ही बाजूंचा परामर्ष घेऊन स्पष्ट व समतोल निर्णय "—**केसरी.** " अत्यंत उपयुक्त ··· प्रत्येक कलोपासकाने आणि लेखकाने काळजीपूर्वक वाचावे "—**ज्ञानमंदिर.** " प्रत्येकाने हा ग्रंथ अभ्यासावाच "—**पुरुषार्थ.** " मा. कवीश्वरांचे मूळ पुस्तक निर्णयाच्या दृष्टीने प्रायः सर्वसंमत आहे. त्यांतील त्यांची समतोल व समंजस विचारसरणि, विद्वत्ता, कुशाग्रबुद्धि इत्यादी गोष्टी कोणाच्याही नजरेस येणाऱ्या आहेत. त्यांची दृष्टी अध्यात्मप्रवण असली तरी अंधश्रद्धेची नाही.··· " **डॉ. के. ना. वाटवे** ( ' कला–नीति–वाद ' पुस्तकाला लिहिलेल्या प्रस्तावनेतून )

## पावित्र्य विडंबनाचा वाद

" तर्कशुद्ध निरूपण ··· विडंबनाचे स्वरूप निश्चित करून स्वतःची व्याख्या दिली आहे. " **वसंत मासिक.** " सर्वस्वी नवीन आणि वेगळा असा विचार कवीश्वरांनी या ग्रंथात मांडलेला आहे ··· निस्संशय महत्त्वाचा "—**भवितव्य,** नागपूर. " अत्यंत मार्मिक ··· समतोल व शास्त्रशुद्ध ··· मोठे अभ्यासपूर्ण ··· निश्चित स्वागतार्ह " —**मनोहर मासिक.**

## फुलांची भेट

विविध ललित लेखसंग्रह. प्रस्तावनाकार, डॉ. वा. वि. आठल्ये; सातारा.

## PROBLEMS OF CHILD EDUCATION IN INDIA

(Edited). Foreword by Dr. Rajendraprasad, President of India.

## गीतातत्त्वदर्शन

अनेक प्रमुख प्राचीन व अर्वाचीन, भारतीय आणि पाश्चिमात्य, विद्वानांच्या विचारांचा चिकित्सक परामर्श घेऊन श्रीमद्भगवद्गीतेचे नीतिशास्त्रदृष्टया सांगोपांग, तौलनिक व विस्तृत विवेचन. कित्येक प्रसृत भ्रमांचे निराकरण.

## THE ETHICS OF THE GĪTĀ

वरील पुस्तकाची अंतर्राष्ट्रीय आवृत्ति. Foreword by Dr. S. Radhakrishnan, President of India. Honoured by the University Grants Commission of India, the Vikram University (Ujjain), and also Jabalpur University.

---